भारत-गौरव-ग्रंथमाला, पुष्प ७० वें.

# बनावट सही



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते

—भगवान् श्रीकृष्ण.

---

लेखक

श्रीनिवास विनायक गोरे

---

साधी प्रत बारा आणे ] १९२७ [ कापडी प्रत एक रुपया




# समर्पण

पूज्य मातुश्री

**कै. ती. सौ. सरस्वतीबाई गोरे**

इच्या आत्म्यास अर्पण.

बालक,

श्रीनिवास विनायक गोरे.

# दोन शब्द

प्रत्येक स्त्री लहानपणीं आईबापांची, तरूणपणीं नवऱ्याची आणि वृद्धपणीं मुलाबाळांच्या हातची बाहुली होऊन बसते. स्त्रीसमाजाच्या दृष्टीनें ही परिस्थिति सुखावह नाहीं असें आजपर्यंत अनेक स्त्रियांनीं बोलून दाखविलें आहे. उत्तान आणि अमर्याद स्त्रीस्वातंत्र्य आणि 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति,' या दोन स्थितींत समाजाला हितकर असा एकादा सुवर्णमध्याचा मार्ग नाहीं का? या प्रश्नाची चर्चा व्हावी या हेतूनें विचारी समाजापुढें हा प्रश्न या नाटकाच्या रूपानें ठेवला आहे.

पुणें, ता. १८ नोव्हेंबर १९२६. श्री. वि. गोरे.

# अभिप्राय.



रा. श्रीनिवास विनायक गोरे यांनीं लिहिलेलें 'बनावट सही' हें नाटक मीं वाचलें. रा. गोरे यांस मराठी वाङ्मयाची सेवा करण्याचें सामर्थ्य चांगलें आहे असें मला वाटतें. त्यांतही कादंबरी किंवा नाटक लिहिण्याची शैली त्यांस चांगली साधली आहे. वाचकांच्या किंवा प्रेक्षकांच्या मनोवृत्ती जेणेंकरून उचंबळून सद्विचार व सद्वर्तन यांच्याकडे वळतील अशाच प्रकारचें संविधानक नाटकांत असावें असा माझा समज आहे व त्याप्रमाणेंच त्यांनीं कल्पनेनें यांत संविधानक घातलें आहे. किंबहुना कांहीं एक नवी कल्पना जगापुढें यावी हा नाटकाचा उच्च हेतुही या नाटकाच्या संविधानांत साधला आहे. यांतील सुशीला हें मुख्य पात्र सुशिक्षित स्त्रियांच्या मनोभूमिका हिंदुसमाजांत कशा नव्या बनत चालल्या आहेत हें उत्तम दाखवीत असून विवाहाचा उच्चतम हेतु कोणता असावा हेंही त्यांत चांगल्या रीतीनें दाखविलें आहे. नाटकाचें दुसरें अंग, चटकदार पण सरळ आणि संभावित शब्दांनीं सजविलेलीं भाषणें, तेंही या नाटकांत चांगलें वठलें आहे. भाषेच्या दृष्टीनेंही हें नाटक चांगलें आहे असें मला वाटतें. एकंदरीनें हें नाटक अगदीं नवीन तऱ्हेचें व पुरुषांस व स्त्रियांस चटका देणारें झालें आहे यांत संशय नाहीं.

पुणें,<br>ता. १ सप्टेंबर १९२४ }

चिंतामण विनायक वैद्य.

# बनावट सही



## अंक १ ला



### प्रवेश १ ला

( दिवाणखान्यांतील एका कोपऱ्यांत वसंतराव टेबलाशीं काम करीत बसलेला आहे. इतक्यांत विठ्या मधल्या राऊंड टेबलावर फुलांचा गुलदस्ता ठेवण्यासाठीं येतो. )

**वसंतरावः**—( खुर्चीवरून वळून ) तुझी धनीण परत आली कारे ?

**विठ्याः**—नाहीं जी अजुनी. येतील पण इतक्यांत. ( पडद्याकडे पाहून ) त्या आल्याच बघा ( जाऊं लागतो. सुशीला दोन बॅग्स घेऊन येते )

**सुशीलाः**—विठ्या त्या जिनसा नीट संभाळून ठेव जा ( विठ्या जातो, सुशीला गाणें गुणगुणत इकडे तिकडे करते )

**वसंतरावः**—हें माझं फुलपाखरूंच का बागडतं आहे ?

**सुशीलाः**—हो !

**वसंतरावः**—ही माझी बुलबुलच का गुणगुणते आहे ?

**सुशीलाः**—हो !

**वसंतरावः**—माझी लाडकी चिमणी घराकडे केव्हां परतली ?

**सुशीलाः**—इतक्यांत आली हो ! ( जवळ जाऊन ) पण गडे इकडे येऊन बघायचं तर खरं मी काय काय आणलं आहे तें.

**वसंतरावः**—( खोट्या तिरसटपणानें ) मी कामांत आहे बरं का. ( ती रुसून जाऊ लागते तों वसंतराव उठून तिला अडवतो. ) अरे बापरे ! लगेच गाल फुगले बरं बरं दाखवा आम्हाला काय काय तुम्ही आणलं आहे तें !

**सुशीलाः**—आतां आधीं ओळखायचं आणि इकडे हरल्यावर मगच आम्ही दाखवूं सारं.

**वसंतरावः**—यापेक्षां आधींच हरलों म्हणून कबूल करतों आम्ही ! ( ती रुसते ) अरेच्या ! पुनः राग आला ! बरं बोवा ओळखतों आम्ही. काय एक उलथनं, एक रंगीत लाटणं, चुलीसाठीं झडपणी...

**सुशीलाः**—(मध्येंच) अहाहा काय पण ओळखणं चाललं आहे ! अशानं मी मुळींच कांहीं दाखवायची नाहीं.

**वसंतरावः**—इतकंचना ? आम्हाला तेवढा खर्च सांगा म्हणजे झालं. तुम्ही इंद्र चंद्र का विकत आणाना ! आम्हाला पैसे किती खर्च झाले तेवढी काळजी आहे.

**सुशीलाः**—कां बरं ? आतां पैशाची काळजी नको म्हणून मला सांगायला झालं ना ? इकडे आतां मॅनेजर व्हायचेंना ?

**वसंतरावः**—अग हो पण बँकेचा मॅनेजर झालो, पगार मोठा मिळूं लागला, म्हणून हवा तसा पैसा उधळूं लागायचं का ? आजपर्यंत आपण दिवस कसे काढले हें लक्षांत आण. परमेश्वराला नुकतीच अपली दया येत चालली आहे तोंच आपण शेफारून जाण्यांत आपला तोटा नाहीं का ? शिवाय माझा पगार हातीं पडायला अद्याप एक महिना अवकाश आहे !

**सुशीलाः**—मला हें सारें कळत का नाहीं ? पण गडे आज गुडीचा पाडवा ना? आपल्या सुखाच्या वर्षाचा दिखिल हाच पाडवा नाहीं का ? थोडं कर्ज झालें तरी पतकरलं पण गडे आज माझा अगदीं विरस करूं नये.

**वसंतरावः**—लाडके, गेले कठिण दिवस पुढें तुझा विरस करण्याच्याच हेतूनें सहन केले का ? पण सुखाच्या पाडव्याबरोबर कर्जाच्या म्हणजे दुःखाच्या पाडव्याचीही तूं गुढी उभारणार काय ? हा कर्जाचा धूमकेतू ज्या घराण्याच्या आवारांत शिरेल त्या घराण्याचा चक्काचूर उडविल्याखेरीज कधींही राहिला आहे का ? अस्मानी सुलतानीचा कांहीं नेम सांगतां येत नाहीं. समज तुझा विरस होऊं नये म्हणून मीं कर्ज केलं आणि थोडेच दिवसांत मी पुनः आजारी पडून ...... ( पुढचें वाक्य सुशीला बोलूं देत नाहीं. )

**सुशीलाः**—( तोंडावर हात ठेवून ) पुढचं अमंगळ बोलाल तर माझी शपथ—

**वसंतरावः**—(तिचा हात काढीत) हो पण तें बेटं अमंगळ घडलंच तर—

**सुशीलाः**—( रागानें ) सणासुदीच्या दिवशीं असलं अभद्र बोलून माझा विरस करण्याची इकडे संवयच आहे. सहज मेली माझी जीभ कुठें कर्जाचं नांव

बरळली तर त्याचा एवढा हा केला ! ( जाऊं लागते–तो तिला मोठ्यानें हसून पोटाशीं धरतो ).

**वसंतराव:**—( तिचा गाल धरून नोटांचें भेंडोळें दाखवितो ) आम्ही एवढा हा केल्याबद्दल कोर्टापुढें हा दंड भरतों (तिच्या हातांत देतो). आतां राग जाइलना ? आतां माझी बुलबुल हसूं लागेलना ?

**सुशीला:**—नुसतं हसूंच कां गाणंसुद्धां गाईल !

**वसंतराव:**—( तिला खुर्चीवर नेऊन बसवितो ) आतां अंमळ अशा बसा आणि आम्हांला सांगा तुम्ही स्वतःसाठीं काय आणलं आहे ?

**सुशीला:**—स्वतःसाठीं ? मला तसं कांहींएक नको आहे !

**वसंतराव:**—तसं कांहीं नको तर कसं हवं आहे ? छे बुवा ! असं कसं होईल ? आजचा सणासुदीचा दिवस आणि बायकांना कांहीं नको म्हणजे ? मी भलत्याच पृथ्वीवर तर नाहीं ना उभा ?

**सुशीला:**—पुरे मेली थट्टा आतां ! हें पहा किं नाहीं मी सांगूं मला काय हवं तें ? मला–मला—

**वसंतराव:**—काढ, ओठाबाहेर काढ एकदां !

**सुशीला:**—मला गोल्डन बँकेचे मॅनेजर आणि सुशीलेचे धनी लखलाभ असोत म्हणजे झालें !

**वसंतराव:**—( आनंदून ) बरं त्यांच्या खालोखाल ? तूं आज कांहीं तरी मागावेंस अशी माझी इच्छा आहे. तुझ्याप्रमाणेंच आज मलाही आनंद झाला आहे. आजच्या इतका आनंदाचा पाडवा माझ्या आयुष्यांत हा दुसराच होय.

**सुशीला:**—अगबाई ! पहिला कोणता बरं ?

**वसंतराव:**—हें उधळं माकड माझ्या गळ्यांत ज्या दिवशीं पडलं तो एक आनंदाचाच आरंभ दिवस नाहीं का ? तो पहिला आणि पैशाची चंगळ ज्यानें उजाडली तो हा आजचा दुसरा ! तेव्हां बोला काय हवं तें !

**सुशीला:**—इकडच्या मनांत मला द्यायचंच आहे तर नेहमीं मला पैसा–पैसा देत असावं. माझ्या या संसारदेवाच्या सुखमय प्रभावळीसाठीं मला पैसाच हवा ! !

**वसंतराव:**—ठीक आहे. माझ्या या उधळभवानीपुढें मी आजपासून पैशाचाच नैवेद्य दाखवीत जाईन.

**सुशीलाः**—आम्हा फुलपाखरांना आणि चिमण्यांना काय काय खर्च असतात हें पुरुषांना काय कळतं ? आमटींत चिंच गूळ कमी झाला म्हणजे एक एक डोळा एवढाला करायचा तेवढा त्यांना ठाऊक असतो. शिवाय मी कांहींच शिल्लक टाकीत नाहीं का ? टाकवेल तेवढी टाकीतच असतें !

**वसंतरावः**—हरकत नाहीं ! टाकवेल तेवढी ! ! पण खरी मजा अशी आहे कीं टाकवतच नाहीं. पैसा तुझ्या हातांत आला रे आला कीं लोण्याप्रमाणें वितळून पार नाहींसा !

**सुशीलाः**—( घड्याळाकडे पाहून ) आज माझी निंदाच करायची आहे कीं बँकेंत जायला उशीर होतो तिकडे लक्ष द्यायचं आहे ?

**वसंतरावः**—( घड्याळाकडे पहात ) आम्हाला टोले देत बसायचं आहे कीं सैंपाकाला उशीर होत आहे इकडे लक्ष द्यायचं आहे ?

**सुशीलाः**—भुकेची तजवीज करीन; पण आधीं मी एक विचारून ठेवतें आहें. मघांपासून विचारीन म्हणतें आहें पण इकडची थट्टा करण्याची लहर थांबेल तेव्हां ना ?

**वसंतरावः**—मीसुद्धां मघांपासून एका गोष्टीसाठीं अगदीं उतावीळ झालों आहें. खरं पाहिलं तर आजच्या दिनचर्येची सुरवात त्या गोष्टीपासूनच व्हायची पण तुमचा प्रेमकलहच थांबेना ! ( खिशांतून मोहनमाळ काढतो. ) इकडे या ! हा आमचा आजचा अल्पसा नजराणा ! ( गळ्यांत घालतो. ) आतां आमचं हक्काचं बक्षिस आम्ही हक्कानें घेणार !

**सुशीलाः**—इश्श ! मोबदल्यावांचून नी बक्षिसावांचून दुसरं बोलणंच नाहीं ! छेः अतां मला होतो आहे उशीर ! आंग धुवायचं, चूल पेटवायची, भाजी चिरायची दगड न धोंडे ! किती किती कामं आहेत ! जातें मी ( जाऊं लागते. तो अडवून मुका घेणार तोंच नाटकराव खोकत प्रवेश करतो. ती 'अगबाई, नाटक भाउजी !' असें म्हणून दूर होते. सुशीलेकडे पाहून नाटकराव हंसतो ) सुशीला जास्त लाजून पळून जाते )

**वसंतरावः**—मोठा दुष्ट आहेस तू !

**नाटकरावः**—( गुणगुणतो ) 'ऐन सुखाच्या समयीं आलों प्रथमचि फसलेंसि मना—उगीच कां आतां हळहळसी ! !' अगदीं गौतमी आत्याबाईसारखा आलों नाहीं रे ! पण हरकत नाहीं. दुसरा अंक अद्याप व्हायचा आहे.

**वसंतराव:**—पण सणांसुदीचा घरीं नीट गोडधड जेवायचं सोडून इकडे कशाला आलास भलत्यावेळीं ?

**नाटकराव:**—आज प्रेमाबाईचं आणि आमचं झालं भांडण; आम्हीं तिला फर्माविलं कीं आज वर्षारंभ आहे तेव्हां सारा देवभोळेपणा टाकून माझ्यावर आजपासून प्रेम करूं लाग. आणि त्याची पहिली खूण म्हणजे दारूचा पेला तिनें स्वतः आमच्या ओंठास लावावा. ती कबूल होईना तेव्हां रागाऊन तुझ्याकडेच जेवावें म्हणून निघालों. वसंता, तूं मोठा सुखी बोवा. आमच्या प्रेमाबाईला हें आतांचं—मघाचं—यांतलं कांहीं एक समजत नाहीं !

**वसंतराव:**—तूं आहेस विक्षिप्त ! रमा वहिनीसारखी सरळ बायको विरळा ! आणि नाटक्या, दारू रे तूं केव्हांपासून पिऊं लागलास ? हें नवंच मला अकल्पित कळतं आहे. मला सांगतांना तुला शरम नाहींरे वाटली ?

**नाटकराव:**—( ओशाळा होतो ) याला कळूं नये म्हणून आज सहा महिने जपलों आणि शेवटीं जिभेनें घात केला. ( उघड ) वसंता, मी पिऊं लागलों म्हणून तुला कोणीं सांगितलें ? तिनें पाजली असती तर कदाचित्—पण मला ठाऊकच होतें ती नाकबूल जाणार म्हणून. केवळ तिची पातिव्रत्याची परीक्षा पाहणार होतों ( विठ्या येतो ).

**विठ्या:**—नटेशराव कागद घेऊन आले आहेत.

**वसंतराव:**—त्यांना बसा म्हणावं ( नाटकरावास ) थोडा वेळ Excuse me अं ! ( जातो )

---

## अंक १ ला

### प्रवेश २ रा

वसंतरावाच्या दिवाणखान्याची बाहेरील बाजू.

**नटेशराव:**—वसंतरावानें या नटेशचा अपमान करावा अं ! नटेशचा अपमान करणें म्हणजे कृष्णसर्पाच्या तोंडांत बोट घालणें आहे हें या वसंत्याला कसें कळलें नाहीं ? ज्या अपराधासाठीं हा मला नाहीं नाहीं तें बोलतो आहे, तसलाच अपराध याच्या प्रत्यक्ष बायकोनें केला आहे हें जर याला कळलं, तर नीतीच्या लांब लांब बाता मारणाऱ्या या वसंतरावाचा गर्व वर्षाऋतूंतील नदीच्या तात्पुरत्या गर्वाप्रमाणें पार ओसरून जाईल. म्हणे तुझ्या अपराधाची चौकशी करीन आणि

गुन्हेगार ठरलास तर पोलिसच्या ताब्यांत देईन. आधीं बायकोला तुरुंगांत घाल म्हणावं, आणि मग माझ्यावर खटला कर! बाकी प्रकरण उघडकीस आलं हें बरोबर झालं नाहीं. मी आपल्याकडून काम कसं बेमालूम केलं असून या वसंत्याच्या भावड्या नजरेस तें कसं ओळखतां आलं याचं मला भारी आश्चर्य वाटतं आहे. तथापि मला भीति बाळगण्याचें कांहींच कारण नाहीं, कारण त्याच्या पायाखालीं तोच विस्तव जळतो आहे. आणि त्याचा पुरावा मजजवळ भक्कम आहे. प्रसंगीं मी एकटा मरणार नाहीं. तिला घेऊन मरेन हें खास. माझ्या अब्रू-बरोबर तिच्याही अब्रूची राखरांगोळी झालीच पाहिजे. पण जाऊं द्या हे विचार! आपणास दुसरीं नाजूक कामें कांहीं थोडीं नाहींत. तेव्हां या वेळीं हे नामर्द विचार नको आहेत. ( समोर पाहून ) पण हे वेडेपीर कोण येत आहेत? हे तर नाटकराव! बरं झालं. डोकें भडकलं होतं अशा वेळीं ही बरी करमणूक आली आहे. विलायतेच्या सफरीमुळें स्वारीचं डोकं फिरून गेलं आहे. आधींच नाटक-मय जीवन झालेलें, त्यांत फ्रान्स इटलीसारख्या रंगेल देशांची सफर! मर्कटाला दारू पाजण्यासारखाच प्रकार झाला आहे. घरची साधीभोळी बायको तरी आतां आवडत असेल कीं नाहीं शंकाच आहे. शंकानिवृत्ति आतां होईलच. जमल्यास हें कुळ हस्तगत करण्यासारखं आहे. आमच्या गुलछबूचा मारा केला पाहिजे या स्वारीवर! असं झाल्यास मग या वसंत्याची नांगी मोडायला काय उशीर लागणार मला! अस्तु; बघूं या काय काय साधतं तें. आपण जरा एकीकडे बसावें आणि अनुकूल संधीची वाट पहावी. स्वारी आपणाशींच पुटपुटत येत आहे. बहुधा प्रेमसंकीर्तनच दिसतें आहे. ठीक आहे. आपणही आतां प्रेमशास्त्री बनून या प्रेमवेड्याला पाश घातला पाहिजे.

( नंतर नाटकराव स्वतांशीं बडबडत येतो )

**नाटकराव:**—या जगांत प्रेम हेंच खरें जीवन आहे. प्रेमाशिवाय ही दुनिया म्हणजे चालत्या बोलत्या प्रेतांची मसणवटीच समजली पाहिजे. आजपर्यंत जगविख्यात अशा अनेक शास्त्रज्ञांनीं अनेक शोध लावून जगाला सुखी करण्याचा प्रयत्न केला आहे; परंतु 'प्रेम' ही काय चीज आहे, पैदास कुठें होते, कशी होते इत्यादी गोष्टींचें पृथक्करण एकाही शास्त्रज्ञानें करूं नये ही किती शरमेची गोष्ट आहे बरें? डार्विननें आम्हांस माकडांचे वंशज म्हटलें आहे, पण माझ्या भोंव-तालचीं हीं प्रेमशून्य माणसें पाहिलीं म्हणजे आम्ही माकडांचे वंशज खास आहोंत असं वाटायला लागतें. प्रेमाचा छडा लावणें, याच कामीं आम्हीं सुशिक्षितांनीं

' रिसर्च सोसायट्यां 'चा उपयोग करायचा असतो. इंजिनियरनें इमारतींपक्षां प्रेमाचेच प्लॅन काढीत बसावें. वकील बॅरिस्टरांनीं प्रेमाच्याच नाजूक गुंतागुंतींचे खटले चालविण्याचें पुण्य संपादावें. डॉक्टरांनीं प्रेमाचेच डायग्नोसिस करीत बसावें. प्रेमशून्य तर्कटांचें म्हणणें आहे कीं, प्रेम हा एक प्रकारचा तारुण्यांत जडणारा दुष्ट रोग आहे व यानें माणसाला वेड लागून शेवटीं त्याचा सर्वस्वनाश होतो. खरें आहे, पण ज्याला ते सर्वस्वनाश समजतात त्याला आम्ही प्रेमी लोक स्वर्गाधिक सुखाचा लाभ समजतों. प्रेमाचा रोग लागलेला राजा पुरूरवा, सीतेसाठीं रानांत वणवण हिंडणारा राजा रामचंद्र, शकुंतलेसाठीं रडत बसलेला राजा दुष्यंत, ती अशोक वनांतली सीता, ती कुंजवनांतली राधा, ती दमयंती, ती सुभद्रा हे प्रेमरोगी खरोखर धन्य होत ! आज कित्येक वर्षे मलादेखील प्रेमाचा रोग लागला आहे आणि प्रेमाचा डॉक्टर कांहीं कुठें सांपडत नाहीं. जर्मनी, फ्रान्स, अमेरिका, इटली या देशांत ते हवे तितके आहेत पण इथं नाहींत. हिंदुस्थान खरोखर प्रत्येक गोष्टींत मागासलेलें राहाणार ! हाय हाय ! या रोगाचे इथें डॉक्टर नाहींत यामुळें हिंदुस्थानांत प्रत्यहीं प्रेमरोगाचे मृत्यु घडत असतील. देवी रोगाला जसें व्हॅक्सिनेशन, प्लेगाला इनाक्युलेशन तसें प्रेमासाठीं एकादें इंजेक्शन नाहीं का ?

( नटेश उत्तर देत देत व हंसत हंसत त्याच्याजवळ जातो. )

**नटेशराव:**—आहे. या रोगाला इंजेक्शन आहे. अगदीं अलीकडचा शोध आहे हा. फ्रेंच सर्जिकल ॲकेडेमीची ही सारी खटपट आहे. फ्रान्सांत हे रोग फार ! Most fatal disease! Romantic disease Sir !! या गरिबाला आपण ओळखीत असालच ?

**नाटकराव:**—आपली भेट झाली, फार उपकार झाले. पण मी आपणांस ओळखलें नाहीं, याबद्दल मी आपली माफी मागतों. कारण माझा फ्रान्स व इटलीचा प्रवास संपवून मी नुकताच परत आलों आहें. आज आठदहा वर्षे तिकडेच होतों. हा रोमॅन्टिक डिसीज मला तिकडेच लागला आहे. तिकडेच इलाज करणार होतों; परंतु आमची प्रेमा अत्यावस्थ आहे, ताबडतोब परत फीर म्हणून वसंतरावाची तार आली. म्हणून निरुपायानें परत यावें लागलें.

**नटेशराव:**—आपणांस मी केव्हांच ओळखलें. या गांवांतील प्रख्यात प्रेमवेडे घराण्यांतील **बृहन्नटीनाथ** ऊर्फ **नाटकराव प्रेमवेडे** आपणच हें मी केव्हांच

ओळखलें. आपण आमचे मॅनेजर वसंतराव यांचे दाट स्नेही. मी त्यांचा असिस्टंट आहें. म्हटलं आतां तरी गरीबाची ओळख पटली असेलच ?

**नाटकरावः**—एकूण आपण नटेशराव **गोल्डनबँकेचे** असिस्टंट मॅनेजर तेच वाटतं ? पण काहो, मघां तुम्ही म्हणालांत प्रेम रोगाला इंजेक्शन आहे म्हणून, तें कसें काय बोवा ?

**नटेशरावः**—तें अगदीं सरळ आहे. अहो, फावल्या वेळांत मी प्रेमशास्त्राचा अभ्यास करून त्यांत परवांच्या परिक्षेंत डिग्रीही मिळविली आहे, म्हणून तुमच्या स्वगत प्रश्नाला मी सहज उत्तर देऊं शकलों. अमेरिकेंत न्यूयॉर्क व शिकागो या दोन प्रख्यात शहरीं प्रेमरोगाचीं इस्पितळं आणि लॅबोरेटरीज आहेत. प्रेमरोग म्हणजे काय, लागतो कसा, याला औषधं कोणतीं, वगैरे सशास्त्र व सप्रयोग शिक्षण देणारीं तेथें अनेक कॉलेजें आहेत. मीही येथें एक दवाखाना उघडला आहे. बँकेच्या दगदगींतून सुटलों म्हणजे फावल्या वेळांत मी हाही धंदा करीत असतों.

**नाटकरावः**—मोठ्याच आनंदाची गोष्ट आहे. आपला दवाखाना कुठेंसा आहे ? आजपर्यंत मी याच फिकीरींत होतों ! कारण फ्रान्समध्यें असतों तर इलाज झाला असता. या भिकार हिंदुस्थानांत प्रेमरोगाचे डॉक्टर असतीलसें वाटत नव्हतें !

**नटेशरावः**—बायकाआळींत शिरल्याबरोबर माझ्या दवाखान्यावर **'प्रेमरुग्णालय-सर्व प्रकारचे प्रेमाचे रोग औषधपाण्याशिवाय, चिरफाडीशिवाय नैसर्गिक अशा बायकी उपचारानेंच बरे केले जातात. गरीबांना जबर फी, पण श्रीमंतांना अगदीं फुकट'** अशी भपकेदार रंगीत पाटी तुम्हाला दिसेल.

**नाटकरावः**—अहाहा ! ( शेकहॅन्ड करतो. ) मग माझ्या रोगाचें डायग्नोसिज करतां का ? मी श्रीमंत आहें. माझा बाप प्रेमाच्या सवद्यांत दलालीचा व्यापार करीत असे. मरते समयीं अडीच लाख रुपये त्यांनीं बॉंबे बँकेंत माझ्या नावें ठेविले आहेत. शिवाय मी सुशिक्षित आहें. आपण माझ्या रोगाचें डायग्नोसिस केलेंत तर आपले मजवर फारच उपकार होतील. मला हा रोग फार आवडतो. रोग-मुक्त होण्यापेक्षां हा रोग वाढेल व मला सुख होईल असें कांहीं औषध मला सांगा. कमी होण्याचें औषध मला रोज मिळतेंच आहे.

**नटेशरावः**—तें कसें काय बुवा ?

**नाटकराव:**—अहो कसें म्हणजे असें. आमची प्रेमशून्य प्रेमा घरीं व वसंतराव तुमचे मॅनेजर आणि सुशीला वहिनी द्या द्वारीं. ही त्रयी जवळ असली म्हणजे त्यांच्या किटकिटीनें व लांब लांब उपदेशांनीं हा रोग कमी होण्याच्या पंथास लागतो.

**नटेशराव:**—एकूण ही त्रयी म्हणजे एक कुपथ्यच म्हणाना ! नाटकराव, तुम्ही त्या त्रयीच्या नादीं अगदीं लागूं नका ! सर्व रोग माणसाला जीवित नकोसें करून टाकतात, पण प्रेमाचा रोग लागला म्हणजे आयुष्य हजार वर्षें लांबेल तर बरें असें वाटायला लागतें. इतर रोगांत रोग कमी झाला तर सुख होतें, पण प्रेमाचा रोग जसजसा वाढेल तसतसें सुखाचेंही प्रमाण वाढूं लागतें. इतर रोगांमुळें संसार निःसार भासूं लागून परमेश्वराबद्दल तिरस्कार उत्पन्न होतो; पण या रोगानें संसार हें सुखाचें नंदनवन वाटून या अनेक उपभोग्य पदार्थांनीं भरलेल्या नंदनवनाच्या निर्माणकर्त्यांचें प्रेमी जन सदोदित सादर अभिनंदन करतात. सारांश, माझें जर ऐकाल तर मी तुम्हाला एक उपाय सांगतों. त्या उपायानें वसंत, सुशीला आणि तुमचें कुटुंब या त्रयीनें कितीही प्रयत्न केला तरी तुमच्या हातून कुपथ्य अगदीं होणार नाहीं. पण थांबा, प्रथम तुमचा मजवर विश्वास बसावा म्हणून माझें या विषयासंबंधीं किती ज्ञान आहे तें तुम्हाला दाखवितों. तुमचे या विषयावर कांहीं प्रश्न असल्यास मला विचारा. ताबडतोब उत्तरें देईन.

**नाटकराव:**—नटेशराव, आपण साक्षात् प्रेमरोगाचे धन्वंतरीच दिसतां ! कारण आपण इतर रोग आणि प्रेमरोग यांमधील प्रेमशून्य माणसांना न कळणारे सूक्ष्म भेद कसे अगदीं विशदपणें मजसमोर मांडलेत. माझा आपणांस पहिला प्रश्न असा आहे. प्रेम ही काय चीज आहे ?

**नटेशराव:**—प्रेम हें एक अत्यंत प्रिय असें वेड आहे.

**नाटकराव:**—प्रेमाची पैदास कुठें होते ?

**नटेशराव:**—बायकांच्या सौंदर्यांत.

**नाटकराव:**—प्रेमाचा उपयोग काय ?

**नटेशराव:**—प्रेमाचे अनेक उपयोग आहेत. ते सांगत बसलों तर ग्रंथ होईल. आणि तसे ग्रंथ आहेतही. पुढें तुम्हाला मी सारें सांगणारच आहें. प्रेमाचा सर्वांत मोठा उपयोग म्हणजे हा कीं, **यत्र नार्यस्तु पूज्यंते रमंते तत्र देवताः** इत्यादि स्मृतींचा पूर्ण अनुभव येतो आणि अशा रीतीनें धर्माचरण घडतें.

**नाटकरावः**—वाः दुहेरी लाभ ! उत्तम ! प्रेमाचा रंग कोणता ?

**नटेशरावः**—जशी बायको भेटेल तसा.

**नाटकरावः**—प्रेमाच्या जाती किती आहेत ?

**नटेशरावः**—सहवासजन्य प्रेम, बळजबरीचें प्रेम, दागिने दिल्यामुळें किंवा देऊं केल्यामुळें उत्पन्न झालेलें प्रेम, स्वाभाविक प्रेम, सौंदर्य प्रेम, पैशाचें प्रेम अशा अनेक जाती प्रेमशास्त्रांत सांगितल्या आहेत.

**नाटकरावः**—तर मग सर्वांत उत्तम जात कोणती ?

**नटेशरावः**—ज्याला इंग्रेजींत Love at the first sight किंवा प्रथमदर्शनी प्रेम म्हणतात तें प्रेम उत्कृष्ट ! ह्या जातीच्या प्रेमाचा शोध पाश्चात्य प्रेमसंशोधकांनीं शुक्राच्या ताऱ्यावरून लावला आहे.

**नाटकरावः**—प्रेमाचा शेवट काय होतो ?

**नटेशरावः**—किती बहारीचा होतो म्हणून सांगूं? **सर्वं बायकामयं जगत्** ! पुरुष देखील बायका दिसूं लागतात. एखाद्या **सर्वं विष्णुमयं जगत्** झालेल्या योग्याला जसा विष्णुरूपाचाच चोहोंकडे भास होऊं लागतो, त्याप्रमाणें प्रेमी माणसाला जिकडे तिकडे स्त्रीरूप दिसूं लागतें. राजा रामचंद्र, राजा पुरूरवा यांना जेव्हां प्रेमाच्या रोगाची बाधा झाली तेव्हां त्यांनीं म्हणे रानावनांमधून झाडें-झुडपें, माकडें, पशुपक्षी इत्यादिकांना आपली प्रिया समजून आलिंगनें दिलीं असा पुराणांतरीं दाखला आहे.

**नाटकरावः**—अगदीं खरं म्हणतां तुम्ही! परवां B. A. करितां शेक्सपीयरचें ' मिड समर नाइटस् ड्रीम ' नांवाचें नाटक वाचीत होतों. तों त्यांतही तसलाच एक प्रकार आढळला. त्या नाटकांतील फेअरीजच्या राणीनें प्रेमाचा रस प्याल्याबरोबर गाढवाचें तोंड My beautiful ass म्हणून कुरवाळलें. अगदीं तदाकार वृत्ति बोआ ! पण नटेशराव, तुमचें सर्टिफिकेट तर सांगा !

**नटेशरावः**—तें काय विचारतां ! मी अमेरिकेंत असतांना एक प्रेमसंस्थेचा अध्यक्ष या नात्यानें मी दोन शब्द बोललों. झालें. तेवढयावरच तेथील प्रेमशास्त्रज्ञ इतके गारीगार झाले कीं, त्यांनीं न्यूयार्कच्या Love Institute मधून L. L. C. ची पदवी मला अर्पण केली.

**नाटकरावः**—L. L. C. ह्मणजे काय बोआ ?

**नटेशरावः**—L. L. C. ही L. L. D सारखीच पदवी आहे. तिचा अर्थ असा, Lisenciate of Love & Courtship. इतकेंच नव्हे तर

तेव्हांपासून माझ्या हिंदी बांधवांनींही माझा गौरव करून मल मानपत्र दिलें. त्यांत '**डॉक्टर प्रेमाजीराव प्रणयराव प्रीतीवाले**' असें प्रेममय नांव मला दिलें आहे. तुह्माला सध्यां उद्योग नसला तर चला माझ्या दवाखान्यांत. तेथें तुम्हाला सर्व ग्रंथ, मासिकें, तसबिरा, माझीं ठिकठिकाणचीं मानपत्रें वगैरे दाखवीन. तिथेंच तुमच्या रोगावर इलाजही योजीन. ( स्वगत ) '**दुनिया झुकती है झुकाने-वाला चाहिये**' हें सावज आतां आजच्या आज गुलछबूच्या जाळयांत अडकविलें पाहिजे. सुशीलेची आणि वसंतरावाची अब्रू माझ्या हातांत, गुलछबूच्या नाटकी प्रेमानें उल्लू बनणाऱ्या या श्रीमंत गाढवाच्या घरचा आमचा कनककांतायोग, मोहनराय, गुलछबू, गोव्यासारखे साथीदार माझी थुंकी झेलण्यास तयार, अशी सुरेख सामग्री जमल्यावर बँकेचा लवकरच मॅनेजर होऊन सुशीला, वसंतराव व नाटकराव यांना देशोधडीला न लावीन तर नांवाचा नटेशच नव्हे. (उघड) नाटकरावसाहेब, आपण पुढें चला, मी आपले घरींच येतों. थोडें इथें काम आहे तेवढें उरकून येतों.

**नाटकराव**:—ठीक आहे. मी आलों होतों सुशीला वहिनींना भेटायला; परंतु आतां त्यांना भेटणें हें आपल्या उपदेशानें कदाचित् कुपथ्य होईल म्हणून मी आतां घरीं आपलीच वाट पहात बसतों. ( जातो )

---

## अंक १ ला

### प्रवेश ३ रा

( सुशीला हिशेब करीत बसली आहे )

**सुशीला**:—आठशें रुपयांतून चार महिने ३० रु. प्रमाणें १२० रु. गेल्या वर्षी दिले. आतां ४० रु. महिना म्हणजे सहा महिन्याचे २४० रु. एकुण ३६० आणि गेल्या महिन्याचे ४० मिळून सारे ४०० मीं दिले. मला उधळी म्हणायचं पण दीड वर्षांत ४०० रु. शिल्लक टाकणारी बायको उधळी असं कोण म्हणेल ? ( समोर रमा येते–सुशीला दचकते ).

**रमा**:—अगबाई, कोणी म्हटलं तुम्हाला उधळी म्हणून ? वसंतराव भाउ-जींनीं का ?

**सुशीला**:—इश्श, रमाबाई ! काय मी घाबरलें हो कोण आलं म्हणून !

**रमाः**—घाबरण्याचं कारण नाहीं. वसंतराव भाउजी आणि आमच्या घरीं दोघेही इतक्यांत नदी कांठीं गेले आहेत फिरायला. तुम्हाला नाहीं का सांगून गेले भाऊजी ?

**सुशीलाः**—खोलींत यायचं झालं असेल पण माझा डोळा लागलेला पाहून परस्परच जाणं झालं असेल.

**रमाः**—असेल ! तसं असेल ! पण ही आजची मुद्रा आणि हे हिशेबाचे कागद–छेः आज कांहींतरीं प्रेमकलह होऊन मोठी खडाजंगी उडालेली दिसते आहे. तरी म्हटलं यांना उधळी कोणी म्हटलं ?

**सुशीलाः**—छेः तसं कांहीं नाहीं हो बाई ! खडाजंगी नाहीं न प्रेमकलह नाहीं. उगाच गेल्या महिन्याचा हिशेब बघत होतें.

**रमाः**—( कागद पहात ) उगाच कां लपंडाव ! हा ८०० चा आंकडा, हा १५० चा, हा ४०० चा ही बेरीज ही वजाबाकी, हें काय म्हणे ३०॥~व्याज ! छे, :हें कांहीं तरी निराळं दिसतं बाई ! हें काय? तुम्हीं अशा काय बघतां आहांत ? तुम्हाला कर्ज कधीं झालं हें ? भाउजींना तर कर्ज म्हटलं कीं अंगाचा तिळपापड होतो !

**सुशीलाः**—रमाबाई, हें कर्ज त्यांनीं केलेलें नाहीं. त्याची जबाबदार मी आहें.

**रमाः**—हें हो काय बाई तुमचें ? तुमचीं नी त्यांचीं कर्जे निरनिराळीं का म्हणायचीं ? अगबाई, ही भाऊबंदकी नवरा बायकोंत सुद्धां चालते का ?

**सुशीलाः**—रमाबाई तुमच्या लक्षांत माझं बोलणें आलं नाहीं. तुम्हाला ठाऊकच आहे गेल्या वर्षीं तिकडे कसा आजार भोगला तो ! आजाराच्या पायीं पैशाचा चुराडा कसा होतो हें मी तुम्हाला सांगावं असं नाहीं. त्यांतच मीं हें कर्ज काढलें आहे आणि आंज हिशोब बघत होतें

**रमाः**— छे बाई, ऐकावं तें नवलच ! म्हणे मी कर्ज काढलं ! भाऊजींच्या परवानगीशिवायच का तुम्हीं हें सारं केलं ?

**सुशीलाः**—रमाबाई, ती वेळ मोठी आणीबाणीची होती. मी तुम्हाला सारं सांगतें ! बरं वाटेना म्हणून शेवटीं डॉक्टरांनीं तिकडे हवेशीर ठिकाणीं जाऊन राहायला जेव्हां सांगितलं तेव्हां आमच्याजवळ पुरते १० रु. सुद्धां शिल्लक नव्हते. मी तिकडे—

**रमाः**—( मध्येंच ) धन्य झाली ग बाई ! आम्ही इतकं त्यावेळीं म्हटलं तर तुम्ही दोघेंही म्हणत असा कीं सध्या पैसे आहेत. गरज लागल्यास तुम्हाला कळवूं म्हणून नी आतां हीं बोलणीं !

**सुशीलाः**—असं हो काय करतां तुम्ही ? पुरतं ऐकून तरी घ्यालना ? मी तिकडे परोपरीनें विनविलं. नाटक भाउजी जवळून उसने रुपये काढावेत आणि परत आल्यावर हळू हळू फेडून टाकावे; एक ना दोन सगळे प्रकार करून पाहिले पण आपलं ज्याचं नांव तें. म्हणे मेलोंतरी बेहेत्तर पण कर्जाचं वारं घराला लागूं देणार नाहीं. आजारांत माणसाला शुद्ध नसते म्हणतात तें खरं बाई ! डॉक्टरांनीं पंचगणीस जाऊन राहायला सांगितलं. जवळ पैसा नाहीं. कर्जाचं नांव नको; आणि मला बाई असं झालं कीं आतां करूं तरी काय ? त्यांत आणखी दुष्काळांत तेरावा महिना म्हणतात तसं बाबांची तार आली कीं तुम्ही दोघें जेवीत असलां तर हात धुवायला इकडे या. झालं ! तिकडे बाबांच्या नाकाशीं सूत धुरलेलं. जवळ मायेचं कोणी नाहीं. इकडची ही तऱ्हा, तेव्हां आतां सांगा रमाबाई, मीं काय करावं अशा वेळीं ?

**रमाः**--छेः बाई पुरुषांचा स्वभाव मोठा हट्टी ! एकूण तुम्ही भाऊजींच्या न कळत कर्ज काढून तो प्रसंग पार पाडला ! पण बाई कर्ज तरी तुम्हांला कोणीं दिलं ?

**सुशीलाः**—आमच्या बँकेंत नटेशराव म्हूणून हेड क्लार्क नाहीं का ? तिकडे असिस्टंट मॅनेजर असायचं तेव्हां नटेशराव आमच्याकडे बरेच वेळ येत असे. आतांसुद्धां कामानिमित्त येतो पुष्कळदां. त्यानें दिले आणून रुपये.

**रमाः**—त्याचा का हा कागद आहे ? आणि असला तरी भाऊजींनीं संमति कशी दिली आणि त्यांनीं या कागदावर सही कशी केली हें अद्याप गूढच राहिलें आहे. तें सांगा मला आधीं. ( विठ्या येतो. )

**विठ्याः**—बाईसाहेब, बाहेर नटेशराव आले आहेत.

**सुशीलाः**—( दचकून ) मग त्यांना सांग तिकडे घरांत नाहींत म्हणून.

**विठ्याः**—सांगितलें; पण ते म्हणतात माझं बाईसाहेबांकडेच काम आहे म्हणून.

**सुशीलाः**—असं ! बरं त्यांना दिवाणखान्यांत बशीव थोडा वेळ. मी ही आलेंच ! रमाबाई, आज मीं त्याचा सारा हिशेब देऊन टाकणार आहें. तुम्ही गडे जाऊं नका. मी लवकरच परत येईन.

**रमाः**—थांबा, बाई, मला भय वाटतं! मी तुम्हाला याच माणसासंबंधीं सांगाय लाआलें होतें. हा माणूस भला नाहीं अशी माझी खात्री झाली आहे. आमच्या घरीं काय सांबाचा अवतार. तिकडे या मेल्यानें भुरळ घातली आहे. आतांशा दारू बरीच वाढली आहे. या माणसाच्या नांवाचा तुम्ही उच्चार केल्याबरोबर तुम्हां आम्हांवरचं संकट मी ओळखलं.

**सुशीलाः**—तुम्ही कांहीं काळजी करू नका! आज त्याचा हिशेब करून दस्तावेज परत घेतला कीं मीं जिंकलें. आणि मग त्याचा बंदोबस्त कसा काय करायचा हें तिकडे, मी व तुम्ही मिळून ठरवावयाला सोपें जाईल.

[ पडदा पडतो. ]

---

## अंक १ ला

### प्रवेश ४ था

( नटेश दिवाणखान्याबाहेर एका बांकावर बसला आहे तों सुशीला येते, तों उठून उभा राहतो. )

**नटेशरावः**—प्रकृति बरी आहेना? म्हटलं जरा उदासी दिसते आहे!

**सुशीलाः**—( तिरस्कारानें ) दस्तावेज आणला आहे का?

**नटेशरावः**—होय. मी त्याच प्रकरणीं बोलावयास आलों आहें अशी आपली समजूत झाली असल्यास ती केवळ चुकीची नसली तरी थोडी तरी आहे. माझं दुसरंच कांहीं म्हणणं आहे.

**सुशीलाः**—तुमचं दुसरं म्हणणं मी मग ऐकेन. आधीं ही आपली बाकी घ्या आणि दस्तावेज माझा मला परत द्या. विठ्या, टेबलावरची दऊत लेखणी घेऊन ये— ( तो तसं करतो )

**नटेशरावः**—माझी बाकी आपण देतां याबद्दल मी आपला फार आभारी आहें. पण मी मुख्य ज्या कामासाठीं आलों आहें तें काम झाल्याशिवाय हा दस्तैवज मी परत देऊं शकत नाहीं, यावद्दल मी दिलगीर आहें.

**सुशीलाः**—इश्श, याचा अर्थ काय? मला दस्तावेज द्या आणि मग आपलं म्हणणं सांगत बसा खंडीभर. नको कोणीं म्हटलं?

**नटेशरावः**—माझ्यावर वसंतरावांची नाराजी झाली आहे आणि लवकरच कदाचित् ते मला कामावरून दूर करणार अशी गुणगुण मला समजली आहे हें खरं का?

**सुशीलाः**—असेल! माझा त्यांत काय संबंध? शिवाय आपल्या वरिष्ठांचा नुसत्या नांवानें उल्लेख करणें हें हाताखालच्या कारकुनांना शोभतं का?

**नटेशरावः**—खरंच, रावसाहेब म्हणायचं विसरलों! पण सुशीलाबाई, रावसाहेबांची आणि माझी लहानपणापासून जानपछान असल्यानें तोंडीं वसंतरावच नांव खिळून बसलं आहे त्याला मी काय करूं? अस्तु; माझी जागा जाऊं नये अशी माझी इच्छा आहे आणि ती राहाणें किंवा जाणें सर्वस्वी तुमच्या हातांत आहे!

**सुशीलाः**—छे हो, भलतंच कांहीं आपलं बोलणं! एवढयाच साठीं आलां असलां तर मी खरंखरं सांगतें कीं हापिसाच्या कामांत ते माझें काडीचेंही ऐकणार नाहींत आणि तसलं तुम्ही मला कांहीं म्हणूं नका. कारण माझं कांहीं चालायचं नाहीं न् कांहीं नाहीं.

**नटेशरावः**—मजजवळ किल्लीच तशी आहे कीं कसलंही आडदांड यंत्र चटकन चालूं लागेल. सुशीलाबाई, माझ्याबद्दल तुम्ही रदबदली केलीच पाहिजे.

**सुशीलाः**—मी करणार नाहीं, आणि त्यांतून तुमच्या सारख्या घातकी माणसाची रदबदली मी कधींही करणार नाहीं. मुकाट्यानें पैसे घ्या व तो दस्तावेज मला परत करून चालते व्हा.

**नटेशरावः**—तुम्ही बऱ्या बोलानें ऐकणार नाहीं तर मी माझं म्हणणें ऐकायला तुम्हाला भाग पाडीन आणि हा कागदच मला त्यांत चांगली मदत करील. समजलांत!

**सुशीलाः**—म्हणजे तुम्ही हें सारं तिकडे सांगणार असंच कीं नाहीं?

**नटेशरावः**—होय असंच. वसंतरावांना कर्जाचा किती तिरस्कार आहे हें मला ठाऊक आहे; आणि हा अपराध त्यांच्याच लाडक्या बायकोनें केलेला त्यांना कधींच सहन होणार नाहीं.

**सुशीलाः**—तुम्ही म्हणतां तें अगदीं खरं आहे. पण माझा हेतु किती शुद्ध होता हें त्यांना कळल्यावर मला ते क्षमाच करतील आणि तुमचा नीचपणा मात्र शिल्लक राहील.

**नटेशरावः**—एकूण तुम्हाला त्यांना कळण्याबद्दल बिलकुल भीति नाहीं तर?

**सुशीलाः**—भीतीपेक्षां मला वाईट मात्र अतिशय वाटेल. नटेशराव, हें कर्ज काढून मी मोठी कामगिरी बजावली, हा जो मला आनंदाचा आणि गर्वाचा विषय

आजपर्यंत होता, तो जाऊन त्या सर्व आनंदाचा भयंकर विरस होईल आणि तो विरस तुमच्या सारख्या हलकट माणसाला करतां येतो आहे याचें मला भारी वाईट वाटतें आहे.

**नटेशराव:**—यापेक्षां जास्त कांहींच नाहीं का होणार ? माझ्यासंबंधानें वसंतरावांपाशीं शिफारस कराल तर हा सारा अनर्थ टळण्यासारखा आहे.

**सुशीला:**—ही तुमची समजूत खोटी आहे. यापेक्षां जास्त अनर्थ कांहींएक होणार नाहीं. तुम्ही मला व्यर्थ भीति घालतां आहांत. करा, तुम्हाला काय हवं तें करा. मी तें भोगायला तयार आहें.

**नटेशराव:**—संकट दिसलें नाहीं तों या वल्गना आहेत. बाईसाहेब, आपण एक गोष्ट साफ विसरलां तरी आहांत किंवा आपल्यास व्यवहार अगदीं कळत नाहीं हें तरी खास ! आतां नीट अवधान देऊन ऐका; आपले पतिराज अत्यावस्थ झाले त्या वेळीं आपण मजजवळ आठशें रुपये मागितले !

**सुशीला:**—होय. मला दुसरा मार्गच नव्हता !

**नटेशराव:**—सदहू रकम व्यवहाराप्रमाणें मी दस्तावेजावर देईन म्हणून तुमच्याकडून दस्तावेज घेतला. दस्तावेज वसंतरावांच्या सहीचा हवा होता.

**सुशीला:**—हो, मग तिकडची सही आहेच त्या दस्तावेजावर !

**नटेशराव:**—कबूल. पण जामीन आणि साक्षीदार म्हणून तुमच्या वडिलांचीही सही मीं मागितली होती हें तुमच्या लक्ष्यांत असेलच ?

**सुशीला:**—अहो पण तिकडची आणि बाबांची सही आहेना कागदावर ?

**नटेशराव:**—होय, पण बेटें घोडें पेंड तिथंच खात आहे. तारखेची जागा मी भरली नव्हती म्हणजे तुमच्या वडिलांनीं आणि पतिराजांनीं तारखा भरून सही करायला हवी होती. त्याप्रमाणें सही झालेला कागद तुम्ही ४।५ दिवसांनीं मजकडे आणला आणि रीतीप्रमाणें मीं तुम्हांस पैसे दिले, येथपर्यंत ठीक झालें. आतां मी तुम्हांस एक प्रश्न विचारतों. आपले वडील त्याच वेळीं आसन्नमरण होते असें तुम्हीं मला सांगितलें होतें. ते लगेच वारले. त्यांच्या देहावसानाचा नक्की दिवस तुम्हाला आठवतो का ?

**सुशीला:**—बाबा श्रावणांत त्रयोदशीस वारले.

**नटेशराव:**—अगदीं बरोबर. म्हणजे सप्टेंबरची २९ तारीख येते. ही डायरी बघा. बाईसाहेब बेटं घोडं पेंड खातं आहे तें इथंच. म्हणजे तुमच्या वडिलांनीं या दस्तावेजावर स्वतःच्या मृत्यूनंतर तीन दिवसांनीं सही केलेली आहे !

**सुशीलाः**—( घाबरून ) म्हणजे !

**नटेशरावः**—म्हणजे दस्तावेजावर तारीख आहे २ आक्टोबर म्हणजे ३ दिवस पुढें ! पण घाबरण्याचें कांहीं कारण नाहीं. मनुष्य आहे, त्यांतून आजारपणा, विसरतोच आहे ! नसेल तारीख भरली. ती मागाहून तुम्ही कोणीं भरली असेल, त्यांत काय मोठंसं आहे. मुद्दा आहे सहीचा. ती तेवढी खरी असली म्हणजे काम झालं ! सही बाबांचीच आहेना ? ( च्छलानें हांसतो )

**सुशीलाः**—( गोंधळते, शेवटीं ) होय बाबांचीच आहे.

**नटेशरावः**—हा मॅग्निफाइंग ग्लास आहे. हें तुमच्या वडिलांचें हस्ताक्षर आहे. हें तुमच्या पतिराजांचें हस्ताक्षर आहे. ' तुम्हीं सही केली का ?' या प्रश्नाचें उत्तर ते कोर्टांत देण्यास तयार होतीलच. इतकी सामग्री मजजवळ असल्यावर सह्या बनावट आहेत कीं खऱ्या आहेत हें कोडें उलगडायचें राहील का ? बोला बाईसाहेब !

**सुशीलाः**—नटेशराव, तुम्हीं डाव साधलात ! होय, त्या सह्या मीं केल्या. बाबांची स्थिति सही करण्यासारखी नव्हती. इकडचीही तीच अवस्था होती. हवा पाणी बदलणं अवश्य होतं. नटेशराव, तिकडचे प्राण धोक्यांत असतांना हवं तें करून त्यांना वांचविण्याचा प्रयत्न करणं मी माझं कर्तव्य समजतें. मी त्या वेळीं दुसरा तिसरा कांहीं विचार केला नाहीं. हाय, हाय, नटेशराव तुम्हीं माझा घात केलात. यापुढें माझा संसार माती झाला. नका हो हें सारं बाहेर फोडूं (रडूं लागते.)

**नटेशरावः**—सुशीलाबाई, ज्या प्रकारच्या अपराधासाठीं माझ्या चाकरीला मी मुकणार, त्याच प्रकारचा अपराध तुम्ही करून उलट मला दटावणार काय ? तुमच्यावर फिर्याद लावण्याचाच कायतो उशीर आहे. वसंतराव मॅनेजर आणि सुशीलाबाई या सुखी जोडप्याच्या संसाराची व अब्रूची काय धूळधाण होईल याचें भेसूर चित्र तुम्हाला दिसूं लागलं का ?

**सुशीलाः**—कोर्ट आमचाही कांहीं विचार करीलच. बाबांचं होणारं प्राणोत्क्रमण निर्घोर व सुखानं व्हावं म्हणून मीं त्यांना आमचं संकट कळविलं नाहीं. इकडच्या मनाला कर्जाचा मोठा तिरस्कार आणि कर्जाशिवाय तरणोपाय नाहीं अशा अवस्थेंत त्यांना नकळत मीं हा कारभार केला. या दोन्ही बाबतींत मी अंतःकरणानें शुद्धच आहें.

**नटेशरावः**—बाईसाहेब, कायदा हेतुबितु कांहीं जाणत नाहीं.

सुशीलाः—मग असले कायदे निवळ मूर्खपणाचे समजले पाहिजेत.

नटेशरावः—मूर्खपणाचे कीं शहाणपणाचे ! या कायद्याप्रमाणेंच तुम्हाला न्याय मिळणार हें मात्र खास.

सुशीलाः—छेः मला नाहीं तसं वाटत. कसंही करून बापाला सुखानें मरण येऊं दे म्हणणारा, हवं तें करून आपल्या पतिदेवाचे प्राण वांचीव म्हणून सांगणारा कायदा जगांत नाहीं का ? असले कायदे असलेच पाहिजेत.

नटेशरावः—तें कांहीं का असेना ! अस्तु; सुशीलाबाई मी तुम्हाला मुदत देतों. तेवढया अवधींत विचार करून ठेवा. मजबद्दल वसंतरावांस सांगा. इतकं मात्र खास समजा कीं, वसंतरावांनीं माझी अब्रू चवाठ्यावर आणली कीं तुम्हां दोघांच्या सुखाची आणि अब्रूची इतिश्री करणें माझ्या पूर्ण हातीं आहे. तुमच्या लक्षांत मी काय बोलतों आहें हें नीटपणें आतां आलेंच असेल. मी म्हणतों तसं होईपर्यंत दस्तावेज तुम्हाला परत मिळणार नाहीं. जातों मी. तसदीची माफी असावी ! ( ऐटीनें निघून जातो. ) ( सुशीला बेभानपणें त्याजकडे पाहत उभी राहते तों पडदा वर जातो. )

सुशीलाः—(स्वगत) नटेशसाठीं तिकडे मीं रदबदली केली नाहीं तर तो मेला माझी अब्रू चवाठ्यावर आणून आमच्या संसाराचे धिंडवडे काढणार ! मी रदबदली करूनही तिकडे जर ऐकलं नाहीं तरी तो तेंच करणार ! तिकडच्या करारी स्वभावाकडे बघितलं म्हणजे माझ्या रदबदलीचा काय परिणाम होईल तो दिसतोच आहे. आतां तिकडच्या मनांत नटेशविषयीं पुरता तिरस्कार आल्यावर माझ्या रदबदलीचा काय बरं उपयोग होणार आहे ? अग बाई स्वारी आलीच ! (इतक्यांत वसंतराव येतो. हातांत कामाचे कागद आहेत ते टेबलावर ठेवीत असतांना )

वसंतरावः—इतक्यांत मजकडे कोणी येऊन गेला का ?

सुशीलाः—इतक्यांत ? नाहीं बाई !

वसंतरावः—नाहीं कसा ? मग आश्चर्यच आहे ! मी इतक्यांत नटेशला या घरांतून बाहेर पडतांना पाहिलं तो भासच का म्हणायचा !

सुशीलाः—अगबाई खरंच कीं ! नटेशराव आले होते हो ! माझ्या लक्षांतच नव्हतं तें !

वसंतरावः—सुशीले, तुझ्या बावरलेल्या मुद्रेवरून तो तुला कांहीं तरी म्हणून बोलून गेला असावा ! तूं मजजवळ रदबदली करावी हेंच तो म्हणाला ना ?

**सुशीलाः**—त्याचा मजकडे येण्यांत दुसरा कोणता हेतु असणार ?

**वसंतरावः**—सुशीले, असल्या हरामखोर माणसाबद्दल तूं रदबदली करणार का ? असल्या दुष्ट माणसाशीं संभाषण करणं महापाप आहे असं तुला वाटलं नाहीं का ? त्याचं येणं मजपासून तूं लपवावं याचा अर्थ तरी काय समजायचा ? (सुशीलेच्या डोळयांत पाणी येतें,) छेः छेः ! इतकं वाईट नको वाटायला (जवळ घेऊन) बरं बोवा, आम्ही आपले शब्द परत घेतों म्हणजे झालंना !

**सुशीलाः**—( आपणास सोडवून ) बरं मी विचारतें आज फारसं काम आहे का ? कागद बिगद बरेच आणले आहेत म्हणून विचारलं !

**वसंतरावः**—आहे, काम पुष्कळच आहे करायला. पण आमच्या बुलबुलाची कांहीं चाकरी असल्यास आम्हांला तीं कामं बाजूला सारलींच पाहिजेत.

**सुशीलाः**—इकडे थोडी फुरसत असली तर मी एक विचारीन म्हणतें आहें. कधींची विचारीन विचारीन म्हणतें आहें, पण मेलं विचारायला गेलें कीं कांहींना कांहींतरी अडथळा येऊन तें मग तसंच राहतं.

**वसंतरावः**—थांबा तर (कॉलबेल वाजवितो. विठ्या येतो. ) बाहेर कोणी आल्यास मी घरांत नाहीं म्हणून सांग. आतां बघतों माझी बुलबुल गात असतांना कोण अडथळा करतं तें ! ( खुर्ची ओढून बसतो )

**सुशीलाः**—माझ्या मनांत हळदीकुंकुं करायचं आहे ज्येष्ठागौरीचें. त्या वेळीं गांवांतल्या सर्व ओळखीच्या बाया येतील. ही संधि साधून त्या दिवशीं आपल्या गांवांत मुलींची शाळा सुरू करण्याबद्दल त्यांचं मत मी विचारणार आहें. इकडे हें आवडेल ना ?

**वसंतरावः**—एकूण आपण येत्या ज्येष्ठांत स्त्रीशिक्षणाच्या चळवळीचा झेंडा उभारणार तर ? कांहीं हरकत नाहीं. दहा शेर हरभऱ्याची डाळ आणि काकड्या खर्च होतील, परंतु त्या कारणीं लागतील. ही कल्पना आम्हाला पसंत आहे. बरं पण आम्हा पुरुषांच्या सभांमध्यें ज्याप्रमाणें बायकांना जागा स्वतंत्र राखून ठेविली जाते तशी तुमच्या या बायकांच्या सभेंत आम्हां पुरुषांसाठीं निराळी जागा राखून ठेवणार कीं नाहीं ?

**सुशीलाः**—नाहीं गडे. स्त्रीशिक्षण हा आमचा विषय आहे. आमचं आम्ही करूं. पुरुषांनीं मध्यें लुडबुड नको करायला. शिवाय अजून गडे तुम्हांला मिसळूं देण्याइतका धीटपणा आमच्या बायकांत आला आहे कुठें ? तें कांहीं नाहीं. आम्ही मागूं ती मदत मात्र इकडे देण्याची मर्जी व्हावी !

**वसंतरावः**—तें आम्हाला ठाऊक आहे. आमच्या मदतीखेरीज पान हलायचं नाहीं! बरं आहे, आपलं कधींचं विचारणं झालं ना? आतां आम्हांला काम करूंद्या (कागद चाळतांना) पाप करावं एकानें आणि निस्तारावं दुसऱ्यानें. या कारकुनांच्या भरंवशावर राहिलं कीं घात झालाच!

**सुशीलाः**—कोणीं घात केला? आज कांहीं कमजास्त झालं आहे वाटतं?

**वसंतरावः**—तसं कांहीं नाहीं. माझं त्यांत कांहीं वांकडं होणार नाहीं पण नसता त्रास आहे खरा. नटेश निघून जाईपर्यंत आणखी काय काय करील भगवान् जाणे!

**सुशीलाः**—म्हणजे आणखी नवीन तें काय केलं मेल्यानं?

**वसंतरावः**—अग पुराण्या फाइली चाळीत होतों तों ४।५ कागद संशयास्पद सहीचे निघाले आहेत. प्रत्येक कागद ४।४-५।५ हजारांचा वटिवलेला चेक आहे. खोट्या सह्या करणं हा कायद्यांतच केवळ भयंकर गुन्हा नसून नीतिदृष्ट्याही तो भयंकर विश्वासघात आहे.

**सुशीलाः**—कायद्यांत असेल मेला गुन्हा. कायद्याचं हो काय! हायकोर्टाचे कायदे म्हणजे मेलं अठराधान्याचं कडबोळं आहे. बरं वाईट, न्याय अन्याय, कमी जास्ती सारं त्यांत खपतं. आम्हां बायकांना काय कळतं म्हणा, पण मीं आपली—भोळेपणानें कां होईना—पण विचारतें, ज्या कोणीं त्या खोट्या सह्या केल्या असतील त्याच्या मुळाशीं खोटेपणाच असेल कशावरून? कदाचित् त्या माणसावर तसलाच, एकादा बिकट प्रसंग असला तर?

**वसंतरावः**—तूं म्हणतेस तसें होणें संभवनीय आहे. कधीं कधीं अज्ञानानें किंवा बळजबरीनें असले गुन्हे होत असतात. परंतु तसल्या अज्ञानानें किंवा बळजबरीनें केलेल्या अपराधाला मनावर घेऊन कडक शिक्षा देण्याइतका कठोर मनाचा मी खचित नाहीं हें तुला कळलं पाहिजे. या नटेशचंच उदाहरण घ्याना. यानें खोट्या सहीचा चेक तर वटविलाच. पण तो गुन्हा दुसऱ्यावर घालून आपण साफ नाकबूल जातो आहे. कांहीं असे असतात कीं अपराध—मग तो कसा का घडला असेना—आपला कबूल करून शिक्षा निमूटपणें सहन करतात आणि पुढें तसें होऊं न देण्याची खबरदारी घेतात. नटेशला मुळीं पश्चात्तापाचें नांवच नाहीं. उलट हरामखोर उर्मटपणा करून नाकबूल जातो आहे.

**सुशीलाः**—तो असं म्हणतो आहे तरी काय आतां?

**वसंतरावः**—तो म्हणतो ह्या सह्या खोट्या आहेत आणि त्या मींच केल्या असं तुम्ही सिद्ध करा. माझ्या पूर्वीच्या मॅनेजरच्या ही गोष्ट लक्षांत आली नाहीं. म्हातारा अगदीं सरळ. पण माझीं दहा वर्षें वकिलीच्या धंद्यांत गेलेलीं. मला त्या कागदाचा संशय आला. शिवाय नुकतीच जी खोटी सही मीं त्याची पकडली आहे तीवरून हें काम नटेशचेंच असावें अशी माझी खात्री झाली आहे ! माणसाचं काळीज तरी पहा ! असलीं माणसं दिसतात तशीं वागणारीं कधींही नसतात. बरं त्यांना तरी त्या वागण्यापासून सुख व्हावं, तर तेंही नाहीं ! त्यांचा गुन्हा जोंपर्यंत उघड होत नाहीं, तोंपर्यंत बाहेर इष्टमित्रांशीं, सग्यासोयऱ्यांशीं संशय येऊं नये म्हणून सारं ढोंगाचं वर्तन त्यांना ठेवावं लागतं. घरांत बायकोशीं लपवालपवी आणि भोंदूपणा, मुलांबाळांशीं तेंच आणि हें शेवटचं तर फारच भयंकर पाप !

**सुशीलाः**—भयंकर पाप !

**वसंतरावः**—अर्थात् ! कोंवळ्या मनाच्या आणि अपक्व बुद्धीच्या बिचाऱ्या त्या अर्भकांच्या भोंवतीं असलं हें खोटेपणाच्या विषारी वायूचें वातावरण पसरलेलें असलें तर त्यांच्या प्रत्येक श्वासोच्छ्वासागणिक त्यांच्या हृदयांत खोटेपणा शिरून पुढें तीं नीतिभ्रष्ट निपजणार नाहींत का ?

**सुशीलाः**—खरंच का असं होतं ?

**वसंतरावः**—समाजांत जो थोडा बहुत वागला आहे किंवा मानसशास्त्राचा ज्यानें थोडा तरी व्यासंग केला आहे त्याला ह्या गोष्टी समजायला कांहीं जड नाहींत. सुशीले, माझ्या वकीलीच्या धंद्यांत मी असतांना सर्व प्रकारचीं माणसें मला दिसलीं आणि इतर विद्वानांप्रमाणें माझाही असा अभिप्राय झाला आहे कीं, जीं माणसें लहानपणांत आणि पुढें गुन्हे करण्यास प्रवृत्त झालीं त्यांचीं मनें दूषित होण्यास, त्यांच्या मनांत पापांकुर उद्भवण्यास त्यांच्या आयाच कारण झाल्या आहेत. अर्थात् त्यांच्या आया दुर्वृत्त असल्या पाहिजेत, असेंच दिसून येईल !

**सुशीलाः**—नुसत्या आयाच कां ह्मणायचं ? बापाचा परिणाम कांहींच का होत नाहीं ? आईबाप दोघेंही सारखींच कारण होत असतील ?

**वसंतरावः**—नाहीं. आईचा सहवास मुलांना जास्त असतो आणि यामुळें आईच्या बऱ्यावाईट संगतीचा परिणाम बापाच्या संगतीपेक्षां बराच जास्त होतो. महादुष्ट किंवा महात्मा असे दोन्ही प्रकारचे जे लोक आजपर्यंत जगाच्या इतिहासांत होऊन गेले, त्यांच्या चरित्राकडे लक्ष दिलें असतांना असें दिसून येईल कीं

त्यांच्या आयाच त्यांना सुवृत्त किंवा दुर्वृत्त बनविण्यास कारण झाल्या आहेत. म्हणूनच म्हणतों कीं स्त्रियांनीं म्हणजे भावी प्रजेच्या भावी मातांनीं आपलें शील संभाळलें पाहिजे. म्हणूनच म्हणतों कीं नटेशसारख्या दुष्ट माणसाची तरफदारी सुशीलेनें पुनः कधींही करूं नये. हें काय ? सुशीले ( जवळ घेऊन ) वाईट वाटूं देऊं नकोस, पण असल्या माणसांच्या स्पर्शानें सुद्धां माझ्या आंगाची आग होऊन जाते हें अक्षरशः खरं समज. (सुशीला दूर होते.)

**सुशीलाः**—काय बाई उकडतं आहे आज ( खिडकीशीं जाते. )

**वसंतरावः**—आणि मीसुद्धां अंमळ नदीकांठीं जाऊन येतों. नाटकराव-संबंधींचे नटेशचे डाव आणि खुद्द गुन्हा ह्या दोन गोष्टींसंबंधानें मी तिकडे आज आपल्या सरकारी डिटेक्टिव्हांची सल्लामसलत घेणार आहें. त्यानें नदीकांठीं वाळवंटांत भेटण्याचें कबूल केलें आहे. (जातो.)

**सुशीलाः**—नटेशसारखा गुन्हा करणारेच केवळ नाहीं तर अनीतीचा नुसता स्पर्श ज्यांच्या मनाला झाला असेल असल्या माणसांची तिडीक तिकडे असावी याबद्दल मी सुख मानायचं कीं दुःख ? बाबांना सुखानें मरण यावं, माझ्या सौभाग्य-देवतेचे प्राण मृत्यूच्या पाशांतून सोडवावे, म्हणून मी त्या वेळीं पापपुण्याचा हिशेब न धरतां केलेलं पाप जर यांना कळलं, तर माझ्या भक्तीचं ते कौतुक करतील कीं नटेशप्रमाणेंच माझा तिरस्कार करतील हें कांहीं सांगवत नाहीं. खोटी सही करणं हा गुन्हा खरा, पण तो गुन्हा करून जर मी पतिदेवाचे प्राण वांचविले आणि पितृदेवाचा अंतकाळ सुखाचा केला तर खोटी सही करणं हें पुण्यच नाहीं का होणार ? कर्तव्यकर्म करीत असतांना अनेकदां पापसाधनं हाताशीं घ्यावीं लागतात. मला तेंच करावं लागलं. करायचं म्हणून केलं नाहीं, तर करावं लागलं म्हणून केलं. याला जर पाप म्हणायचं असेल तर आमचीं नीतिशास्त्रें म्हणजे पाप-पुण्याच्या मीमांसेचा विचका आणि पोरखेळच म्हणायचा नाहीं का ? माझी अब्रू नटेशच्या हातांत असल्यानें तो तिकडे अगदीं जुमानीत नाहीं आणि यामुळें त्याला पुरी शिक्षा घडावी म्हणून तिकडच्या मनानें पेट घेतला आहे. अशा स्थितींत मीं काय करावं हें मला कोण सांगणार ? तिकडे मीं माझं पाप सांगितलं तरी अनर्थ टळेलच असा कांहीं नेम नाहीं. न सांगावं तर नटेश आपला डाव साधणार. इतकेंच नव्हे तर आम्हा दोघांचा जन्मभर तो छळ करणार ! त्याच्या चौकशीसाठीं सरकारी गुप्त पोलिसाची योजना तिकडे करूं म्हणायचं; पण तेवढ्या-नेंच तो चिडून जाऊन मजवर फिर्याद लावूं लागला तर साराच घात होणार

आहे ! नाटकभाऊजींची तीच दशा होणार ! त्यांचा नाटकी स्वभाव आणि माझी खोटी सही या कात्रीच्या दोन पात्यांनीं नटेश आम्हा चौघांचे तुकडे करण्यासाठीं उठला आहे. स्वतःवर संकट असतां दुसऱ्यांवर संकटं घालण्याचे खेळ यां नटेशला सुचतात तरी कसे ? आतां लवकरच त्याची चौकशी सुरू होऊन त्याला अटक होणार. कदाचित् जामीन देऊन मेला मोकळाही राहील; पण तेवढयानें तो सुटला असें नाहींच. काय त्याचे घातकी डावपेंच आहेत ! आणि अशा प्रसंगींही तो कां डगमगत नाहीं, हें बाई त्याचं त्यालाच ठाऊक ! पण मी आता काय करूं ? रमाबाईचं पातिव्रत्य रक्षण करतां येईल, नाटक भाऊजींचाही बचाव होऊं शकेल; पण आम्हां दोघांच्या अब्रूचं रक्षण कसं होणार ? देवा, तूं भावाचा भुकेला आहेस असं म्हणतात ! हा गुन्हा करतां वेळचा माझा भाव तुला कळला आहे ! आमच्या सुखाच्या संसाराची लाज तुलाच असूं दे !

(पडदा पडतो.)



# अंक २ रा



## प्रवेश १ ला

[ नाटकरावाचें घर. नाटकराव व नटेश बोलत येतात. ]

**नाटकरावः**—डॉक्टर, तूं म्हणतोस पण मला नाहीं खरं वाटत. अरे माझी वायको म्हणजे शुद्ध बैलाची घरधनीण समज. तिच्यांत प्रेम कसं तें मुळींच नाहीं. बघ आतांच तुझी खात्री करून देतों. डॉक्टर, मी कंटाळलों हिला. आपण दुसरं लग्न करणार बोवा! बहिऱ्या! बहिऱ्या!! अरे बहिऱ्या!!! ( येतो. ) माझ्या घरांत दिवळ्या मुरळीचा गोंधळ माजला आहे! हा दिवळ्या बहिरट आणि ती मुरळी अर्धवट.

**नटेशः**—वाः, या खंडोबारायाच्या देवळांत एकादा वाघ्या नको का? मित्रा मी देतों तुला एक वाघ्या. हा दिवळ्या दे मला आणि माझा वाघ्या मी तुला देतों. पण हें बघ तो तुझ्या नंदीबैलाच्या घरधनिणीसारखा अर्धवट किंवा याच्या सारखा बहिरट मुळींच नाहीं. तो अगदीं तुझ्याच सारखा प्रेमट आहे. चल, आहे कबूल?

**नाटकरावः**—कबूल! प्रेमट धनी प्रेमट चाकर! बस ठरलं. Let us have this bargain. उद्यां पासून—नको आजपासूनच याला घेऊन जा आणि त्याला पाठवून दे. त्याचें नांव काय बरें?

**नटेशः**—गोव्याजीराव दोनबायके. त्याला दोन बायका आहेत. एक तरुण आणि एक म्हातारी. यामुळें लोक त्याला दोनबायके म्हणून हांक मारतात. मोठा रंगेल, चतुर, हुशार, धीट, बुद्धिमान, इमानी—अगदीं कुत्र्याची जात!

**नाटकरावः**—मित्रा, अगदीं सोन्यापेक्षां पिवळं, साखरेपेक्षां गोड आणि बर्फा-पेक्षां पांढरं. ( ओरडून ) बहिऱ्या, जवळ ये. आजपासून तूं डॉक्टरसाहे-बांचा चाकर, समजलास? जा आपल्या यजमानणीस बोलाव इकडे. ( रमाबाई पोथीचें पान घेऊन येते. ) काय करीत होतीस ग?

**रमाः**—हें काय? पोथी वाचीत होतें.

**नाटकरावः**—( वेडावतो ) पीथी व्याचीत होतें! ( पान हिसकावतो. ) कसली घाण ही! शिवलीलामृत! Oh! the five headed monster!

Damn him (चोळामोळा करून तिच्या अंगावर फेकतो.) त्या पांच तोंड्याचें चरित्र वाचून काय दगड मिळविणार आहेस ? अगदीं हिरवट—रानवट तूं!

**रमाः**—( हुंदके देत ) माझा असो मेला, पण देवाचा तरी अपमान करायचा नव्हता !

**नटेशः**—नाटकराव, प्रेम वांया गळतं आहे रे ! सांभाळ नाहीं तर घात ! !

**नाटकरावः**—प्रेम वायां गळतं आहे ? नाकांतून कीं डोळ्यांतून ? ( ओंजळ पुढें करून ) प्रेमाबाई ! पदरानें पुसूं नका; मी ओंजळींत धरतों तें ( ती रडत जाते; तो मागें जाऊं लागतो. नटेश ओढतो. ) अरे जाऊं दे मला ! त्या प्रेमाला बाटलींत भरून ठेवतों ! !

**नटेशः**—मित्रा, तूं मोठा रंगेल आणि प्रेमळ गडी आहेस खरा. पण गड्या, तुझ्या ओंजळीचा अर्थ माझ्या ध्यानांत नाहीं आला.

**नाटकरावः**—अरे, तूं म्हणालास घात होईल. त्यावरून मला एक कल्पना आली. विराटाच्या सभेंत धर्माचा कपाळमोक्ष झाला त्या वेळेस द्रौपदीनें त्याच्या कपाळांतलें रक्त आपल्या ओंजळींत धरलें. नाहींतर पृथ्वी भाजून निघाली असतीना ! माझ्या बायकोच्या डोळमोक्षाच्या वेळीं मलाच द्रौपदी व्हावें लागलें.

**नटेशः**—शाबास ! याला म्हणावें प्रसंगावधान्—

**नाटकरावः**—आणि विद्वान् ! !

**नटेशः**—यांत विद्वत्तेचा काय संबंध ?

**नाटकरावः**—तोही सांगतों ! मला त्याच वेळेस अशीही कल्पना आली. पण थांब, मी तुला आधीं एक प्रश्न विचारतों. आपण हिंदू लोक काळे कुट्ट कां रे ?

**नटेशः**—अंः, त्यांत काय आहे ? हिंदूंचा देव काळा, हिंदूचा देश उष्ण, म्हणून हिंदू काळे !

**नाटकरावः**—छेः, डॉक्टर, तूं रांकट विद्वान दिसतोस. प्रेमळ अणि रसिक विद्वान नाहींस. आतां माझा कयास ऐक ! छिनाल बायकोला जसा एकच नवरा नाहीं, तसंच हिंदूंना एकच देव नाहीं. काळा कृष्ण, तसा गोरा महादेव, तांबडा अग्नी, पिवळा सूर्य असे अनेक रंगांचे अनेक देव आहेत. मग त्यांची भक्तमंडळी नको का त्या त्या रंगाची ? तें असो. माझा कयास दुसराच आहे. अरे, धर्मराजाचं रक्त पृथ्वीवर पडलं असतं तर काय झालं असतं सांग बघूं ?

**नटेशः**—पृथ्वी जळली असती !

**नाटकरावः**—होयना! होयना!! तर मग तें रक्त खालीं पडलं. थोडंसं पडलं!

**नटेशः**—कशावरून ?

**नाटकरावः**—हँः हँः हँः अरे इतकं सुद्धां कळूं नये ? अरे इतकं सुद्धा कळूं नये ? रक्त पृथ्वीवर पडलं अशाबद्दलचा एक ताम्रपट पांडवांच्या कोरीव लेण्यांत एका जर्मन अँटिक्वेरिअनला सांपडला आहे. हो, रक्त पृथ्वीवर सांडलं, आगीचा भडका उडाला, ज्वाळांचा डोंब उसळला, धुरानें आकाश व्यापलें! सारें विश्व तडतडां जळायला लागलें आणि आपले गोरे गोरे पान पूर्वज जळून कोळसे झाले—चुकलों—होरपळून काळे ठिक्कर पडले. आणि मग यथा राजा तथा प्रजा झाली. डॉक्टर तेव्हांपासूनच हा देश उष्ण झाला आहे बरं का ?

**नटेशः**—( घड्याळ त्याच्या समोर धरून ) अहो गप्पाष्टके, गुलछबू! प्रेम विलास महाल!!

**नाटकरावः**—गुलछबू! प्रेमविलास महाल!! तें मी विसरलोंच. चला तर तिकडेच!

**नटेशः**—छेः, असल्या साध्या पोशाकानें तिच्याकडे जायचें ? नाटकराव, प्रेम प्रेम म्हणतोस पण पोशाखांत कांहीं तुझ्या प्रेम दिसत नाहीं.

**नाटकरावः**—खरंच, thanks for your kind suggestion! त्याची व्यवस्था उद्यां करतों बघ. मग आज नकाच जाऊं तिकडे. तूं आज इथेंच जेव आणि मग त्या उल्लूचंद नाटक कंपनीच्या ‘ **प्रेमलीला** ’ नाटकास जाऊं. तो ‘ **प्रेमसंन्यास** ’ नको बुवा.

**नटेशः**—मित्रा, तूं मला थोडा विसराळू दिसतोस.

**नाटकरावः**—म्हणजे !

**नटेशः**—नाहीं म्हटलं तूं जसा कृपाळू आहेस, प्रेमाळू आहेस, तसा विसराळूही आहेस.

**नाटकरावः**—पण मी असं विसरलों तरी काय ?

**नटेशः**—हें पहा, मी सरळ मनाचा आहें तरी भिडस्त फार. तेव्हां तूंच आठवण करशील तर पहा.

**नाटकरावः**—( आठवतो ) छेरे, नाहीं आठवत. डॉक्टर, मी विसराळू खरा, पण तूं मला घोटाळ्यांत टाकलें आहेस, तेव्हां तूंही जरा घोटाळूच दिसतोस.

**नटेशः**—बरें, जाऊंदे त्या गोष्टी आतां. आठवण होईल तेव्हां खरी. काल त्या प्रेमविलासांतल्या गुलछबूशीं तुझी इन्ट्रोडक्शन करून दिलीच आहे. तिच्याविषयीं खरें खुरें तुझें मत काय झालें तें सांग मला.

**नाटकरावः**—इन्ट्रोडक्शन! डॉक्टर, आलं बरं का माझ्या ध्यानांत. आतां आलं!

**नटेशः**—तें काय बोवा ?

**नाटकरावः**—आमच्या प्रेमाबाईशीं तुझी इन्ट्रोडक्शन करावी म्हणून आज तुला मी आमच्या जनानखान्यांत आणलें. मध्यंतरीं तिचें प्रेम वायां जाऊं लागलें. तें सांवरण्याच्या धांदलींत अगदीं विसरूनच गेलों. मित्रा, हा तुझा भिडस्तपणा खरा अं!

**नटेशः**—नाहींरे, तसं कांहीं नाहीं. अरे, ह्या घरच्या स्वाधीनच्या गोष्टी. ह्या केव्हांही उरकून घेतां येतील. मी तुला तें आपलें सरळपणानें विचारलें कीं ती तुला तुझ्या मनासारखी आवडली ना ?

**नाटकरावः**—गुलछबू! डॉक्टर, माझा असा तर्क आहे कीं, ज्यांच्या नांवांत मधुरता, सुंदरता, कोमलता, प्रेमलता असेल, त्यांच्या हृदयांतही ती असलीच पाहिजे. गुलछबू! हा उर्दू शब्द आहे. शुद्ध उच्चार गुलेशब्बू असा आहे. गुल म्हणजे फूल. शब् म्हणजे रात्र. बू म्हणजे सुगंध! जें फूल रात्रीं सुगंध देतें तें गुलशब्बू!! डॉक्टर कसलीरे आपली हेंगाडी मराठी भाषा! संस्कृत भाषा पाहावी तर सत्तर वर्षांच्या थेरडीसारखी प्रौढ! तारुण्याचें प्रेम व कोमलता या दोन्ही मायलेकींत नाहींच. गुलछबूच्या फुलाला आपण निशीगंध म्हणतों. गुलछब्बू हा शब्द जसा कानाला गोड लागतो तसा निशीगंध लागत नाहीं. या दोन्ही शब्दांत आणखी एक फरक आहे. गुलछबू हा शब्द उच्चारतांच तोंड कसं गोड, बोबडं आणि बायकी होतें. निशिगंध शब्द उच्चारतांना वेदाभ्यासजड राकट आवाजाच्या भटाभिक्षुकाप्रमाणें अगदीं तोंडांत मारल्यासारखें होतें. हें बघ. गुलछबू! निशिगंध! अगदीं हरिः ओं प्रमाणें!

**नटेशः**—नाटकराव, मी विचारतों काय आहें आणि तूं आपला तिच्या नांवाची व्युत्पत्ति काय काढायला लागलास. तुझा मुद्देसूदपणा मी तेव्हांपासून अनुभवीत आहें. अथपासून इतीपर्यंत तूं अगदीं मुद्देसूद वर्तन करतो आहेस.

**नाटकरावः**—थांब, वेट, जरा दमानें घे! आधीं तिच्या नांवाच्या जादूंतून तर मला सुटूंदे. तुकोबारायानें म्हटलं आहे कीं ' नामसंकीर्तन साधन पै सोपें!'

त्या प्रेमदेवतेला पाहिल्यापासून डॉक्टर मला असं झालं आहे कीं–अहाहा, काय बरं तिचे ते जातावेळचे शब्द ? हं ' नेहमीं दर्शन द्यायचं, व्हावं बरं का ! आतां केव्हां यायचं होईल ? ' नाहीं तर आमची ही. ' बाहेर जायचं होत असेल तर लवकर परतायचं. मला प्रदोष सोडायचा आहे ! ' रुक्ष, नीरस, unromantic अगदीं !

**नटेशः**—अरे हो पण—

**नाटकरावः**—आहे, माझ्या लक्षांत आहे; विसरलों नाहीं. वेट, जरा दमानें घे. बहिऱ्या ! बहिऱ्या ! ! अपमान ! ! ! ( आंत जातो )

**नटेशः**—हा मासा माझ्या गळाला पुरता अडकला. मूर्ख बेटा, घरच्या सद्गुणी बायकोला टाकून ती बाजारबसवी याला आवडली ! आतां तिच्या दारांत हा कुतऱ्यासारखा लोळणार. फुलाचा वास फुकट जाऊं नये. गुणाचें चीज झालें पाहिजे. नाटकरावाला घरचें हें कोमल फूल आवडत नाहीं तर त्याचा आस्वाद माझ्यासारखा भ्रमरच घेणार. रमे, गुलछबूच्या अग्नींत याची आहुती पडल्याबरोबर मी तुला माझी करणार. रमेचा राम नाटकराव होणें शक्य नाहीं. हा डॉक्टर नटेशच तिचा राम होणार ( नाटकराव व बहिरू येतात. )

**नाटकरावः**—( कान धरून ) अपमान ! स्वतः मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं. ( कान सोडून ) क्षमा. जा, तिला बोलाव इकडे ( तो जातो. दारू पीत असतांना रमा येते. लुगड्याचा बोळा काठीवर घातलेला आहे )

**रमाः**—आज हें मांडलें आहे तरी काय ? मघाशीं अशीच सोंवळी पोथी वाचीत असतांना इकडे बोलावून मला शिवलांत म्हणून दुसऱ्यांदा आंग धुवून लुगडें वाळत घालणार तों पुनः बोलावणं आहेच ! असं काय करावं बरं ? शिवाय मला अतां सैंपाक करायचा ना ?

**नाटकरावः**—प्रेमा, त्या चिंध्या टाक तिकडे. तें लांकूड फेंक ( उठून तिचा हात धरणार तों ती दूर होते )

**रमाः**—नका शिवूं गडे. ही मी दुसऱ्यांदा आंग धुतलें हो.

**नाटकरावः**—अपमान ! ( तिचा हात धरतो. ) क्षमा ! प्रेमे, हे माझे परम प्राण प्रेमळ मित्र डॉक्टर प्रेमाजीराव प्रणयराव प्रीतिवाले, लायसेंशिएट इन लव्ह ॲन्ड कोर्टशिप, शिकागो लव्ह इन्स्टिट्यूट, अमेरिका, ( डॉक्टरकडे वळून त्याचा हात धरून ) ही माझी गांवढळ नीरस, कुणबाऊ, अडीच मणाची बेडी, माझ्या

गळयांतली संसाराची धोंड, नांव रमाबाई, अगदीं unromantic, पण मी जिला प्रेमाबाई म्हणून romantic नांवानें हांक मारतों, अशी ही पुराणी आजीबाई ऊर्फ माझी बायको! मी तुम्हा दोघांची ओळख करून देण्यांत स्वत:ला मोठा भाग्यवान् समजतों. ( हात मिळवणार तोंच रमा झिडकारते )

**रमाः**—हें काय हें असं? परपुरुषाच्या हातांत माझा हात काय म्हणून? मला असले चाळे खपणार नाहींत सांगतें. तोंडानें हवं तितकें बोला, पण आर्य स्त्रीच्या संस्कृतीला तुमच्या या घाणेरड्या चालीचा विटाळ मी होऊं देणार नाहीं. ओळख करून घ्यायला अगदीं हातांत हात नको आहेत घालायला. आपलं चित्त अलीकडे मी पाहतें आहें, भलत्याच आचरटपणाकडे वळलं आहे. आपणांस खरेपणा नकोसा होऊन नक्कल जास्त आवडायला लागली आहे. खरें तें खरें आणि नक्कल ती नक्कल, असें शेवटीं इकडच्या अनुभवाला येईलच. पण गडे, माझी अशी विनंति आहे कीं असा विषाचा अनुभव घेण्याच्या भानगडींत इकडे पडूं नये. आपण माझे देव! आर्य स्त्रीचा पति हाच देव आहे. माझ्या बोलण्याचा राग येऊं नये. मला क्षमा करावी. ( नमस्कार करून निघून जाते. )

नृराव ~~[illegible]~~ः—अपमान! अपमान!! डॉक्टर, तुझा माझा दोघांचा अपमान!!! अंगाचा संताप! लाही! आग! भडका! दाह! जळफळाट, थयथयाट, सगळं होतं आहे या वेळीं! अपमान!!!

**नटेशरावः**—मित्रा, शांत हो, अरे या खेडवळ बायका. यांना उच्च संस्कृतीची काय कल्पना होणार? खरोखर तुझ्या दुर्भाग्याची मला कींव येते. तुझ्या सारख्या रंगेल, सुशिक्षित, हौशी, पैसेवाल्या तरुणास अशी अडाणी, रानटी, जंगली बायको मिळणें म्हणजे शुभ्र नंदी बैलाला काळ्याढोण म्हशीनें माळ घालण्यासारखें आहे. मित्रा, शांत हो. तुझ्याकरतांच मी आपला अपमान विसरतों.

**नाटकरावः**—क्षमा, मित्रा, क्षमा!! यावेळीं माझा तो प्रेमाचा पोशाख असता तर या जंगली आगीनें होरपळलेला मी गुलछबूच्या प्रेमाच्या बोरिक लोशनमध्यें आतांच्या आतां जाऊन उडी टाकली असती. मित्रा, मला हृदयाशीं धर आणि आपल्या प्रेमाचें मलम माझ्या अंगावर चोळ. ( त्याला आलिंगन देतो. ) कुठें तें गुलछबूचें प्रेमळ नाजूक बोलणें आणि कुठें ही ढालगज भवानी!

**नटेशरावः**—मित्रा, आपण अंमळ बागेंत बसूया म्हणजे मी तिथं तुझं समाधान करीन.

**नाटकराव**:—नवऱ्यानें दहाजणांत बायकोचा अपमान करणें तर तो त्याचा धर्मच आहे; पण बायकोनें नवऱ्याचा अपमान करणें म्हणजे काय? तिनें—त्या आर्यस्त्री म्हणविणाऱ्या स्त्रीनें—माझा—आर्य पुरुषाचा अपमान करावा? आणि तोहि माझ्या जानी दोस्ता समक्ष? चंद्र उष्ण होईल, सूर्य बर्फाचा गोळा होईल, व पृथ्वीभोंवतीं सूर्य घिरट्या घालील, फार तर काय प्रेमा पुरुष होईल, मी बायको होईन, पण हा अपमान मला सहन होणार नाहीं. चल, माझ्या जानी दोस्ता, बागेंत मला घेऊन चल. तिथें गुलाबाच्या फुलांवर निजवून, भ्रमरांचें गाणें, ऐकवून, कमलाच्या पाकळीनें वारा घालून, कारंजाच्या तुषारांनीं, मोरांच्या नाचांनीं, मोहोरांच्या सुगंधांनीं माझें शांतवन कर. ( सुस्कारे सोडीत नटेशराव रेलून जातो. )

**नटेशराव**:—रमेनं माझा तिरस्कार केला काय? बरं आहे!!

---

# अंक २ रा

## प्रवेश ३ रा.

[ स्थळः—नदीकांठ—मोहनराय व नटेश आपसांत संकेत करीत आहेत. ]

**नटेश**:—( समोर पाहून ) अरे पण वसंतराव आलाच हा. बघितलास का? तो बघ त्या घाटावर कोणाशीं बोलत उभा आहे. त्याच्या दृष्टीस मी पडणें म्हणजे आपण होऊन आपले पायावर धोंडा पाडून घेणें आहे. मी असाच जवळ पास असतों. बोलत बोलत त्या पलीकडच्या दगडाच्या राशीजवळ त्याला घेऊन ये. त्या मोठ्या दगडाच्या आड मी बसणार आहें; समजलास का? मोहनराय, सावधगिरी ठेव. त्याला अगदीं संशय येतां कामा नये. ( जातो. )

**मोहन**:—( पाहून ) गेला. या नटेशजवळ कसली शक्ति आहे कोणास ठाऊक? अमूक काम कर असें त्यानें एकदां म्हटल्यावर नाहीं म्हणण्याची कांहीं माझी प्राज्ञा होत नाहीं. सरकारी डिटेक्टिव्ह म्हणून मी वसंतरावाला आतां भेटणार! पण खरा सरकारी डिटेक्टिव्ह जर आमच्यावर दांत ओंठ खाऊं लागला तर मग कसं? वसंतरावानें धाडलेलें खऱ्या डिटेक्टिव्हचें पत्र नटेशानें मधल्या मध्यें पकडून मलाच डिटेक्टिव्ह बनविलें. वसंतरावास खऱ्या डिटेक्टिव्हची ओळख नाहीं म्हणूनच तो मला सरकारी डिटेक्टिव्ह समजेल! हें सारें ठीक आहे;

पण हा लपंडाव साधला तर बरं, नाहीं तर उद्यांचं मरण आजच ओढून आणल्यासारखें नाहीं का होणार ? आतां वसंतरावांचा या पुढचा सारा पत्रव्यवहार नटेशानें आपल्या नजरेखालीं ठेवला तरच कांहीं साधण्याचा संभव आहे. नाहीं तर—पण जाऊं द्या आपण सांगितल्या कामाचे धनी, त्यांत मात्र आपण चुकतां कामा नये. जरा घसरलं कीं नटेशाचं नख बसलंच माझ्या नरडीवर—( पाहून ) आलेच वसंतराव ! ( गंभीरपणें इकडे तिकडे फिरतो. वसंतराव येतो. )

[ मोहन त्याच्याजवळ जाऊन इकडे तिकडे पाहून आपल्या नांवाची कार्ड देतो आणि कोटाच्या आंतल्या भागांतील सी. आय. डी. चा बिल्ला दाखवून वसंतरावाची खात्री करून देतो ]

**वसंतरावः**—माझ्या विनंतीला मान देऊन आपण मला येथें भेटण्याची कृपा केली याबद्दल मी आपला मनापासून आभारी आहें !

**मोहनः**—वसंतराव, सरकारी कामांत कोणी कोणाचे आभार मानण्याचें कारण नाहीं. कारण हीं कामें करण्याबद्दल सरकार आम्हाला भरपूर मोबदला देतच आहे. बरं पण आतां असं करा-ही जागा आपणास सुरक्षित नाहीं. कां म्हणाल तर ज्या व्यक्तीविषयीं आपणांस बोलावयाचें आहे ती व्यक्ति कांहीं सामान्य नाहीं. त्यानें आपले साथीदार पाळतीवर ठेविले असल्यास उगाच आपला संकोच होणार. नदीकांठीं सर्व प्रकारचीं माणसें हवा खावयाला येणार. त्यांपैकींच त्याच्या कोणा साथीदारानें माझ्याशीं बोलतांना तुम्हांस पाहिलें तर ? तेव्हां चला आपण असेच बोलत बोलत त्या पलीकडच्या दगडाच्या राशीकडे जाऊंया. तेथें आपणास कोणी पाहणार नाहीं ( बोलत बोलत जातात आणि दगडांवर बसूं लागतात तोंच—)

**मोहनः**—( हळूच ) पण थांबा, मी जरा चौफेर बघून येतों. ( तसें करून बसतो.) हं, आतां बोला तुम्हाला काय बोलायचं असेल तें. अगदीं सारं सविस्तर सांगा. तुम्हाला मीं सांगावं अशांतला कांहीं भाग नाहीं. पण ज्याप्रमाणें वकीलाजवळ आणि डॉक्टराजवळ अगदीं सारं आंतलं बाहेरलं सगळं ओकलं पाहिजे, तसंच आम्हां डिटेक्टिव्हांशींही कांहींही लपवितां कामा नये.

**वसंतरावः**—आपणाशीं मला आज दोन गोष्टींबद्दल सल्ला मसलत व विनंति करावयाची आहे. एक ही कीं बँकेच्या कागदांत जी नटेशानें अफरातफर केली आहे किंवा खोटे कागद केले आहेत ते उघडकीस आणून बँकेची अब्रू राखणें. दुसरी जरा खासगी स्वरूपाची आहे, म्हणजे माझे मित्र नाटकराव अलीकडे त्या

दुष्ट माणसाच्या नादीं लागले असल्यानें कदाचित् त्या दुष्टाचा डोळा त्यांच्या संपत्तीवर किंबहुना त्यांच्या कुटुंबावरही असावा असा जो मला संशय आला आहे—नव्हे खात्री आहे—त्याबद्दल योग्य ती सल्लामसलत मला देऊन त्या संकटापासून नाटकरावांचें संरक्षण करणें ही दुसरी गोष्ट आहे. या दुसऱ्या गोष्टीसंबंधानें आपल्यासारख्या प्रख्यात डिटेक्टिव्हला तसदी देण्याचें कांहीं कारण नव्हतें. पण नटेश किती भयंकर माणूस आहे याची मला थोडी कल्पना असल्यानें व अद्याप तो मोकळाच वावरत असल्यानें त्याच्यावर आपल्या सारख्याची नजर राहणें इष्ट आहे असें मला वाटलें. शिवाय खोट्या कागदांचें प्रकरण उलगडत असतांना आपणांस हें काम सहज करतां येईल; त्यासाठीं म्हणजे मुद्दाम वेगळी नजर ठेवण्याचें कारण नाहीं.

**मोहनः**—तुमचें म्हणणें रास्त आहे, तुमच्या या दूरदर्शीपणाबद्दल मलाही कौतुक वाटत आहे. चतुर माणसाला साध्या व क्षुद्र गोष्टींत सुद्धां कधीं कधीं पुढच्या अनर्थांचीं चिन्हें दिसत असतात. बरं तर, आधीं हें खोट्या कागदाचें प्रकरण मला सांगा; कारण हें सरकारी अब्रूबेअब्रूचें काम आहे व तें आधीं करणें हें माझें आद्य कर्तव्य आहे. खासगी कामें आपण फावल्या वेळांत करूं!

**वसंतरावः**—आपणास ठाऊकच आहे मी गेल्या गुडीपाडव्याला चीफ मॅनेजरचा चार्ज घेतला ! अर्थात् स्वतंत्र अधिकारानें जुन्यापुराण्या आणि नव्या अशा सर्व प्रकारच्या कागदांची तपासणी करण्याच्या उद्योगास मी लागलों असतांना मला कांहीं कागदांचा संशय आला म्हणून मी नटेशला त्यांबद्दल विचारलें. मी सहज विचारलें, पण त्याचें मन त्याला खात असल्यानें माझ्या प्रश्नांचीं तो उडवाउडवीचीं उत्तरें देऊं लागला. त्याच्या उत्तरांनीं अर्थात् माझं समाधान होईना, आणि जसजसा तो जास्त बोलूं लागला, तसतसा मला आपला त्याचाच संशय येऊं लागला. मी कांहीं दिवस तसेच जाऊं दिले. इतक्यांत एक इसम बँकेंतील आपल्या ठेवीपैकीं पांच हजार रुपयांची रकम काढून नेण्यासाठीं आला. त्याला रकम देण्यांत आली पण त्याचा आमचा हिशेब कांहीं केल्या जमेना. आम्ही म्हटलें कीं २००० रुपये तुम्ही मागेंच काढून नेले आहेत. तो म्हणे गेल्या वर्षांत मी पैही परत काढून नेली नाहीं. कागदपत्र पहातां चेकवर त्याची सही होती. तो म्हणाला ही माझी सही नाहीं. तेव्हां ही खोटी सही कोणा चोरानें केली हें एक आम्हाला मोठें गूढच पडलें आहे. त्या इसमालाही मोठा अचंबा वाटत आहे. परंतु त्याच्या पैशाचें नुकसान झाल्यानें तो

आम्हाला जाब विचारायला तयार होणें साहजिकच आहे. परंतु आम्हीं तरी त्याला काय उत्तर द्यावें ? बँकेची बेअब्रू, दोन हजारांचें आजचें नुकसान आणि असलेच कांहीं जुने कागद, त्या इसमाचा राग, माझी नवीन नेमणूक इत्यादि कारणांनीं मला या प्रकरणीं फारच काळजी वाटत आहे आणि येवढ्याच साठीं आपल्या सारख्या नांवाजलेल्या डिटेक्टिव्ह अंमलदाराच्या कानांवर ही गोष्ट घालणें मला भाग पडलें आहे !

**मोहनः**—तुम्हाला नटेशचाच इतका बळकट संशय कां आला असावा हें तुम्ही सांगूं शकाल काय ?

**वसंतरावः**—मजजवळ तसलीं सबळ कारणें किंवा पुरावा म्हणण्यासारखा नाहीं. पण त्या दिवशींचीं त्याचीं उडवाउडवीचीं उत्तरें, तसेंच अलीकडचा त्याचा वाढलेला अतोनात उन्मत्तपणा, शिवाय त्याचें माझ्या मित्राशीं असलेलें हलकटपणाचें वर्तन इत्यादि गोष्टी माझ्या मनांत त्याच्याविषयींच संशय उत्पन्न करतात. इतकेंच नव्हे तर परवां मी त्याला नोकरीवरून काढून टाकण्याची धमकी दिली असतां तो माझ्या पश्चात् आमच्या घरीं आला आणि आमच्या कुटुंबानें त्याजबद्दल मजपाशीं रदबदली करावी अशी परोपरीची विनवणी तिजजवळ करून गेला. अर्थात् त्याला सदहू प्रकरणाचें बरेंच महत्व वाटत असावें असा माझा कयास आहे.

**मोहनः**—तुमचा कयास आणि संशय अगदींच कांहीं गैरवाजवी नाहीं. तथापि नोकरपेशा माणसानें नोकरी जाण्याची भीति धरावी आणि ती जाऊं नये म्हणून शक्य ती खटपट करावी हें मानवी स्वभावाला अनुसरूनच आहे.

**वसंतरावः**—आपलें म्हणणें खोडून काढण्याचा मी प्रयत्न करीत नाहीं. तथापि माझें इतक्यांतच कांहीं सांगून झालें नाहीं. माझ्या पूर्वीच्या चीफ मॅनेजरचें या नटेशविषयीं नेहमीं चांगलें मत असे. परंतु मला तर त्याच्या रोमरोमीं धाईटपणा भरलेला दिसत होता. असें कां व्हावें म्हणून मी तेव्हांपासूनच नटेशावर लक्ष ठेवीत आलों आहें. पुढें मला असें कळलें कीं चीफ मॅनेजरसाहेबांच्या घरीं याचें जाणें येणें बरेंच आहे. झालें, माझ्या शंकेचें समाधान झालें. मॅनेजर साहेबांचें याच्याविषयीं इतकें चांगलें मत कां असावें याचा उलगडा झाला. आमचे मॅनेजरसाहेब मोठ्या लोकांच्या प्रसिद्ध गुणांप्रमाणें हलक्या कानाचे आणि पराकाष्ठेचे स्तुतिप्रिय होते. इतके कीं वेळेवर लांचलुचपतीच्या मोहापेक्षां स्तुतिमय भाषणांचाच अधिक पगडा त्यांच्या मनावर बसत असे. नटेश त्यांचा

अगदीं विश्वासू कारकून झाल्यासारखा झाला होता. मॅनेजरसाहेबांच्या स्तुतिप्रिय आणि हलक्या स्वभावाचा नटेशनें पूर्ण फायदा घेतला, व बँकेच्या जमाखर्चांच्या कागदांत तो मन मानेल तशा गफलती करूं लागला. बँकेचें अस्तित्व जमाखर्चांच्या खरेपणावर व व्यवस्थितपणावरच अवलंबून असतें, आणि त्यामुळें बँकेंत असल्या लबाड्या करणें मोठें धाडसाचें आणि चातुर्याचें काम असतें. नटेशला समाजाच्या दुर्दैवानें धाडस आणि चातुर्य ही जोडगोळी अनुकूल असल्यानें त्यानें बँकेच्या काळजालाच जणुं काय हात घातला आहे. कांहीं दिवस तर नटेशच चीफ मॅनेजर होणार अशी अफवा होती; पण माझा क्लेम आणि बँकेच्या डायरेक्टरांचें तारतम्य, तसेंच मजविषयींचें अनुकूल मत यांच्या योगानें माजी मॅनेजर रिटायर झाल्याबरोबर माझीच रीतसर नेमणूक करण्यांत आली. या अवधींतच ज्या प्रकरणीं मी आपणास तसदी देत आहें तें प्रकरण उद्भवलें. जुने कागद आणि नवे कागद यांमधील ठेवीवाल्यांची भाषा व त्यांच्या सह्या यांमध्यें किंचित् फरक आहे असें मी सूक्ष्म नजरेनें पहातां दिसून आलें. आपणांस आतांच दाखवितों. ( खिशांतून दोन पत्रें काढतो. ) हा जुना अर्ज आणि हा अलीकडचा अर्ज. आतां आपणच पहा म्हणजे झालें. आपणांसही तो फरक दिसल्यास संशयाचा पुरावा देण्याचें माझें काम झालें असें मी समजेन ( मोहन मॅग्निफाइंग ग्लास काढून दोन्ही कागद निरखून पाहूं लागतो, )

**मोहनः**—तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें यांत फरक दिसतो आहे खरा. पण हा नटेशच्या हातानें झाला आहे कीं इतर कोणाच्या, हा एक वादग्रस्त प्रश्न आहे.

**वसंतरावः**—आणि तोच प्रश्न आपण आतां सोडवायचा आहे. माझा नटेशवरच संशय आहे.

**मोहनः**—कदाचित् तुमचें म्हणणें खरेंही असेल. उद्यां तुमच्या आफिसांत मी येईन आणि या कागदांचा फोटोग्राफ घेऊन जाईन, नंतर अपराधी शोधण्यास बरें पडेल. आतां तुमच्या नाटकरावांची हकीकत मला ऐकणें आहे. परंतु मला असें वाटतें, आपणांस बराच उशीर होईल. रात्रही बरीच होऊं लागली आहे आणि फार वेळ तुम्ही आम्ही येथें राहिल्यानेंही उगाच कोणाला संशयाचें कारण होईल. अतःपर मी सांगतों तें लक्ष्यांत ठेवा कीं, तुमच्या माझ्या भेटी शक्य तितक्या कमी पडाव्या. अगदीं जरूर असेल तेव्हांच भेटण्याचा प्रयत्न करावा. मी आतां तुमच्या दोन्ही कामांसाठीं कंबर बांधली आहे असं तुम्ही समजा आणि

निष्काळजी असा. तुमच्या नाटकरावाची हकीकत मी पुनः केव्हां तरी ऐकेन. सध्यां तुम्ही एवढें मात्र करा कीं नटेशला आणखी कांहीं दिवस हवा तसा नाचूं द्या. वरवर दुर्लक्ष आहेसें दाखवा. त्याला कामावरून सस्पेण्डसुद्धां करूं नका सध्यां. प्रसंगानुसार मी तुम्हांस सूचना देत जाईनच.

**वसंतराव:**—आपल्या कर्तबगारीवर माझा पूर्ण विश्वास आहे. आपल्या म्हणण्याप्रमाणेंच मी वागेन; पण मी चीफ मॅनेजर आहें हें लक्षांत घेऊन त्या नात्यानेंही जरूर पडल्यास त्याच्याशीं नरम गरम वागण्यास आपलेकडून हरकत नसावी. कारण बँक म्हणजे माझें घरचें काम नव्हे. तिच्या कामांत त्याचे कडून अडथळा होऊं लागला तर मी तत्काळ त्याला दूर करीन.

**मोहन:**—अहो मी म्हटलेंना, जरूरीप्रमाणें—प्रसंगाप्रमाणें कोणीही वागला तर त्यांत त्याचा दोष नाहीं. जरूर किंवा प्रसंग ओळखणें इथेंच कित्येक शहाणे सुर्ते चुकत असतात. तुह्मी तसं कराल हा माझ्या म्हणण्याचा भाव नाहीं पण ही आपली एक प्रिकॉशनरी वार्निंग आहे. बरं आहे, आपण पुढें व्हा, बरोबर जाणें कदाचित् धोक्याचें होईल. ( वसंतराव जातो. नटेश हळूच उठून मोहनकडे येतो. ) काय, कसं काय साधलं नटेशराव ?

**नटेश:**—( टाळी देऊन ) अगदीं सोळा आणे ! चल आतां पुढचं ठरवूं या.

**[ पडदा पडतो. ]**

# अंक २ रा

## प्रवेश ३ रा

[ रस्ता:—नाटकराव अर्धवट झिंगलेला प्रवेश करतो. ]

**नाटकराव:**—या प्रेमाच्या पोषाखांत मला पाहून गुलछब्बू तर अगदीं गारेगार होऊन जाईलच, पण तिच्या दारावरचा राकट भैया देखील आपला राकटपणा विसरून मला कडकडून आलिंगन देईल. असा हा आजचा रंग आहे. पुरुषांच्या प्रेमाचा रंग लाल भडक असतो म्हणून हा लाल भडक पोषाख करविला. प्रेमाचें लालरसायन पिऊन डोळेदेखील कसे प्रेमानें धुंद आणि लाल भडक केले

आहेत. सगळा चेहरादेखील प्रेमानें लाल भडक केला पाहिजे होता, पण तसें न करण्यास दोन कारणें झालीं. एक तर माझा चेहरा लाल भडक पाहून तो दारावरचा भैया मला लाल तोंडाचें माकड समजून अंगावर धावत यायचा! हो त्यांना-रानवटच ते-प्रेमाचा रंग काय ठाऊक? दुसरें कारण असें कीं आमची स्वारी गुलछब्बूसारख्या प्रेमाच्या पुतळीजवळ प्रणययाचना करायचीच; आणि त्या वेळीं विडा देऊन, प्रेमाचें लाल औषध पाजून, प्रसंगविशेषीं प्रेमाच्या चापट्या चेहऱ्यावर मारून चेहरा आयता लाल भडक करीलच. तेव्हां म्हटलं आपण ही एवढी यातायात फुकट कां करावी? आज पोषाखांत कांहीं कमतरता ठेवली नाहीं. प्रेमाच्या रंगाचा कोट, प्रेम रंगाचीच विजार, प्रेमाचे मोजे, बूट, नेकटाय, कॉलर, डायमंड पिन, हॅट सर्व कांहीं प्रेम रंगाचें! अर्रर्रर्र! एक चुकलें! अगदीं चुकलें!! खिशांतलें घड्याळ काळें पांढरें आणि हा सोन्याचा छेडा पिवळा. याला काय उपाय करावा? आतांच्या आतां स्विट्झरलंडांत तार करून लाल रंगाचें घड्याळ आणवूं का? पण हो. प्रेमशून्य पांढऱ्या फटफटीत बर्फाळ डोंगरांत वसलेल्या स्विट्झरलंडांत लाल रंगाचें घड्याळ कोठलें मिळायला? मग आतां कसं? गुलछब्बू काय म्हणेल? मला प्रेमाबाई काय म्हणेल याचें कधीं भय वाटत नाहीं पण गुलछब्बूचें भय वाटतें. आवडत्या रांडेचा प्रत्येक प्रेमी खुशालचंद गुलाम असतो. ( विचार करून ) आलं लक्षांत! वारे डोकें! गाढवाच्या धडावर ठेविलें तर तोदेखील अक्कलवंत व्हायचा. बायकांच्या प्रेमळ दृष्टीमुळें त्यांना हिऱ्या मोत्याचे, सोन्या चांदीचे दागिने देखील प्रेमळ म्हणजे अर्थात् लाल दिसत असतील. निदान दागिन्यांचा तरी बायकांच्या डोळ्यावर असा परिणाम होत असेल कीं ते सोन्या मोत्याचे दागिने प्रेमरंगाचेच दिसावे. मग माझें घड्याळ आणि हा सोन्याचा छेडा तिच्या दृष्टीला भारून टाकणार यांत शंका नाहीं. चला काम झालें! मोठी धोंड उतरली! शिवाय दुसरें असें कीं लाल रंगाच्या झकाकींत पिवळ्या सोन्यावर गुलाबी रंगाची झांक मारत असते. पुरुषांच्या प्रेमाचा रंग जरी लाल भडक असला, तरी बायकांच्या प्रेमाचा रंग अगदीं गुलाबाच्या फुलाप्रमाणें फूलगुलाबी! तेव्हां त्याही दृष्टीनें माझें चांदीचें घड्याळ व छेडा गुलछब्बूला गुलाबीच दिसेल. याप्रमाणें पोशाखाची, माझ्या मनाची, आणि पिशवीची मनासारखी सिद्धता झाल्यावर गुलछब्बूचा फोटो जसा या छेड्याला लटकतो आहे, तशी ती प्रत्यक्ष माझ्या गळ्यांत लटकायला आतां काय उशीर? मी हा असा उभा राहीन आणि ती अशी समोर उभी असेल. प्रेम आंधळें

असतें. तेव्हां मी असा डोळे मिटून, बाहू पसरून उभा राहीन; आणि जेव्हां ती प्रेमाची पुतळी या भाग्यवंताच्या बाहुपाशांत घट्ट—

( गोब्या हातांत सांपडतो. )

**गोट्याः**—अरेरेरे! धनी साब, मी तो आपला गोब्या!!!

**नाटकरावः**—( त्याला ढकलतो. ) तरी म्हटलं लुशलुशीत कल्पनेचा भास व्हायचा तो दगडी कसा झाला? अपमान! (तो हात जोडतो.) अपमान! ( तो पायां पडतो.) अपमान!! (तो पायांवर लोळतो.) क्षमा! क्षमा आहे तुला!! उठ. गोब्या, सैतानाच्या कुत्र्या, माझ्या रंगाचा बेरंग केलास!

**गोट्याः**—धनीसाब, भररस्त्यावर कोणीं रंग केला म्हणजे त्याचा बेरंगच होत असतो. हो, साहजिक आहे. शिवाय सरकार, कांहीं दिवसांपूर्वीं मी सैतानाचा कुत्रा होतों. पण सध्यां सैतानाच्या मित्राचा मी इमानी आणि प्रेमळ कुत्रा आहें. हो, साहजिकच आहे.

**नाटकरावः**—मग तूं चाललास कुठें? ह्या हातांत बाटल्या कसल्या?

**गोट्याः**—प्रेमरसायन नाहीं तें सरकार! मी त्या गुलछबूबाईकडे चाललों आहें. हो, साहाजिकच आहे.

**नाटकरावः**—गुलछबूकडे! कां रे? कोणीं सांगितलें तुला?

**गोट्याः**—माझे धनी जुने सैतान नटेशरावसाहेब ते मला वाटेंत भेटले आणि म्हणाले, गोब्या, हें औषध गुलछबूला नेऊन दे आणि तिला सांग—हो, साहाजिकच आहे—हें औषध पी म्हणजे छातींतल्या कळा शांत होतील. हो, साहाजिकच आहे.

**नाटकरावः**—छातींत कळा! माझ्या—त्यांतून माझ्या प्रेमदेवतेच्या—त्यांत छातींत आणि त्यांतून कळा!! गोब्या, मला सांवर; मी बेशुद्ध होणार आहें! कारण, प्रियकरणीचें लहानसेंही दुःख ऐकून प्रियकरानें बेशुद्ध पडलें पाहिजे अशी प्रेमशास्त्राची आज्ञा आहे!

**गोट्याः**—होय का? मग जरा थांबा! या शेजारच्या बागेंत चला. हो, साहाजिकच आहे, प्रेमी माणसानें आपल्या प्रियकरिणीसाठीं बागेंतील लतामंडपांतच बेशुद्ध होण्याची पद्धत आहे. हो, साहाजिकच आहे.

**नाटकरावः**—चला तर तिथेंच बेशुद्ध पडेन. ( जातात )

**( पडदा पडतो. )**

---

## अंक २ रा

### प्रवेश ४ था

[ गुलछबू गुलाबी पातळ नेसलेली व नटेश बोलत बसले आहेत. ]

**नटेशः**—बार अगदीं असा उडाला पाहिजे कीं पहिल्याच गोळीला शिकार खालीं पडली पाहिजे गुलछबू, बरं का !

**गुलछबूः**—इतकं दहादां नको आहे सांगायला अगदीं ! आजपर्यंत ज्या करण्यानें माझी तुंबडी भरली, जें करतांना मला अपयश आलें नाहीं तेंच आज करायचें आहे. बायकांच्या गोळीला पुरुषांची शिकार जितकी सहज मिळते तितकी दुसरी कोणतीही आहे का ?

**नटेशः**—अग शिकारी शिकारींत देखील भेद असतो. एकाद्या पुरुषाला जाळ्यांत ओढायला स्त्रियांना आपलें सर्व कसब खर्च करावें लागतें; इतकेंच नव्हे तर पुढच्या लाभासाठीं कित्येक शिकारीप्रीत्यर्थ सुंदर बायकांना कांहीं काळ आपलें सर्वस्व ओतावें लागतें.

**गुलछबूः**—तें सारें खरें, पण मी म्हणतें या शिकारींत एवढं जड असं काय आहे ? नाटकराव म्हणजे नाटकी प्रेमानें भाळणारे उल्लू तरुण !!

**नटेशः**—अग या शिकारींत जड म्हणशील तर पर्वताएवढें जड आहे आणि हलकें म्हणशील तर गवताच्या काडीपेक्षांही हलकें आहे. म्हणून दहादां नाहीं वीसदां बजावितों, कीं फार सावधगिरीनें वाग.

**गुलछबूः**—बरं, ते आतां येणार केव्हांसे आहेत ?

**नटेशः**—तो इतक्यांत आला पाहिजे होता. उशीर कां झाला कळत नाहीं. तूं आपली तयारी करून बैस. मी त्याला लवकरच आणतों. पुन्हा बजावतों, तो नांवाचा नाटकराव आहे. त्याला तूं नुसतें नाटक दाखविलें पाहिजेस. जर भूमिका चुकविलीस तर त्याला तत्काळ संशय येऊन असली उत्तम शिकार व्यर्थ जाईल.

**गुलछबूः**—किती हो सांगतां ? ( तो जातो ) नाटकराव प्रेमाच्या पोकळ कल्पनांनीं उल्लू झालेला एक तरुण पैसेवाला आहे म्हणे ! प्रेमाच्या बाह्य देखाव्यानें तो म्हणे माझ्या जाळ्यांत सांपडणार. ठीक आहे. पण त्यांत माझा फायदा चांगला झाला तर सारें. नाहीं तर मेलं महिना दोन महिने मेहनत करावी, जिवाला त्रास करून घ्यावा आणि आपला डोंगर पोखरून उंदीर निघावा शेवटीं. डॉक्टरच्या सांगण्यावरून त्याचे म्हणे अडीच लाख रुपये बँकेंत जमा आहेत. हें

जर खरें असेल—पण तें असेलच खरं-डॉक्टर माझ्याकरितां किती झटतात बिचारे! त्यांचं माझ्यावर खरं प्रेम आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें शिकार साधली तर जन्माची दगदग मिटली. नाटकरावाची शिकार जर मी हाणून पाडली, तर अगदीं चक्रवाढ व्याजानेंच नव्हे तर मुद्दलाच्या हजारों पट रकम माझ्या हातांत खेळेल. खरंच, डॉक्टर मोठा भला मनुष्य आहे.

**रेवडी**:—( येऊन ) बाहेर नाटकराव आणि डॉक्टर उभे आहेत.

**गुलछबू**:—होय का? जा, लवकर घेऊन ये आंत, जा. आतां नाटकाचा पहिला पडदा उघडला!

[ विरहिणीसारखी बसते. नाटकराव व नटेश येतात. ]

**नटेश**:—पाहिलेंस. केवळ आठ दिवसांत काय ही हिची दशा! आणि हें सारें तुझ्यासाठीं हो. तूं जो तिच्या जिवाला एकदां चटका लावला आहेस त्यानें ती सारखी भाजते आहे. हं, इतक्यांत पुढें जाऊं नकोस. कोणत्याही धीरोदात्त नायकानें आपल्या प्रियेचें स्वगत भाषण मुद्दाम आडून ऐकिलें पाहिजे असा प्रेमशास्त्राचा सिद्धांत विसरलास वाटतं? आतां माझें कर्तव्य मीं केलें. मी आतां जातों. तुमच्या दोघांत माझा तिसऱ्याचा खोकला कशाला? पुढचें संभाळ बरं का! ( जातो. )

[ नाटकराव उल्लूसारखा गुलछबूच्या चेष्टा पाहतो. ती त्याला न पाहिलेंसें करून स्वगत बोलत राहते. ]

**गुलछबू**:—नाथ, रोहिणीला जसा चंद्र, पश्चिम दिशेला जसा सविता, रतीला मदन, तसे तुम्ही मला प्रिय आहांत. तुमच्या स्मरणानें रात्रीचा दिवस व दिवसाची रात्र मी करीत असतें, पण तुम्हाला माझी दया येत नाहीं. अहाहा, माझ्या परमेश्वरा नाटकरावा, तुमच्या मांडीवर मी बसलेली, तुमच्या गळयांत हात घातलेली, एकदा तुमच्या मुखचंद्राकडे टक लावून पहात असलेली, तर दुसऱ्यांदा लज्जेनें आणि प्रेमनिर्भरानें तुमच्या प्रेमानें उन्नत आणि विशाल झालेल्या हृदयावर डोकें ठेवून जणुं काय तुमच्या हृदयांतील उचंबळत असलेल्या प्रेमाच्या लाटांचें मधुर गायन ऐकत असलेली-किंवा तुमच्या हृदयाशीं प्रेमाचें हितगुज करीत असलेली अशी माझी तसबीर मला कधीं पाहायला मिळेल? ती पहा, ती मदनमनोहर मूर्ति, माझ्या प्रेमाचे, तनाचे, मनाचे, धनाचे मालिक! अहाहा, तो प्रेमाचा ईश्वर मजकडेच येत आहे!

**नाटकराव**:—(एकीकडे) धन्य मी, धन्य मी ! काय हें प्रेम, काय हें हृदय ! माझ्याकरितां बिचारी झुरत आहे अगदीं ! आणि मी प्रेमाचा पोषाख मजजवळ नव्हता, याच क्षुल्लक सबबीवर आठ दिवस हिला भेटलों नाहीं. मूर्ख, अगदीं मूर्ख मी. अशा प्रेमानें ओथंबलेल्या या गुलछब्बूला, प्रेमानें रसरसलेल्या या अंतःकरणाला, माझ्या वियोगदुःखानें तडफडत असलेल्या या सुंदरीला मी व्यर्थ त्रास दिला. नाटकरावा, सुंदर बायकांचें जो मन दुखवितो त्याला अशी ( तोंडांत मारून घेतो ) ही अशी शिक्षा मिळत असते.

**गुलछबू**:—नाथा, मी किती आतुर झालें आहें ! हाय, हाय ! पुरुष मेले निर्दय खरे !! आम्ही इतका जीव तोडतों, पण त्यांच्या दगडी हृदयाला पाझर फुटेना ! नाथा नाटकेश्वरा, असा मला विरहसंताप देणें तुम्हाला शोभतें का ?

**नाटकराव**:—( पुन्हा मारून घेतो, कान पिळून घेतो. ) अग, नाहीं शोभत. ही घे शिक्षा, घे ! काय करूं मी येथें उभा असतांना ही दुःख भोगते आहे. पण डॉक्टरनें सांगितलें आहे कीं धीरोदात्त नायकानें ज्या वेळीं प्रिया कल्पनेनेंच आपल्या प्राणेश्वराला जवळ समजून मिठी मारायला धांवेल त्या वेळेसच एकदम पुढें होऊन तिच्या बाहुपाशांत आपणास बांधून घ्यावें. मला तर आतां हिच्या या स्थितीनें धीर निघत नाहीं. ( सुस्कारा सोडतो. )

**गुलछबू**:—आली ! नाथाला दया आली ! ते पहा मजकडे कसे दयादृष्टीनें पाहताहेत. अहाहा ! या प्रेममूर्तीला मी मनोभावानें नमन करितें. अगबाई, ते इकडेच येऊं लागले. ती चालण्याची ऐट, तो पोषाख, तें मजकडे रोखून पहाणें ! छे बाई, दृष्ट लागेल हो तुम्हाला ! नका पाहूं असे मजकडे. काय, पहाणार ? पण मेली माझी दृष्ट नाहींना लागायची ? हो लागेल. मी डोळे झांकतें आपले. अगबाई मी डोळे झांकले तेवढ्या अवधींत अगदीं जवळच यायचं झालं. ( उभी राहते. ) छे, थांबा गडे. अग दासींनो, आरती आणा ग ! आतां कसं करूं ? मी अगदीं भांबावलें बाई !

**नाटकराव**:—ही अगदीं माझ्या स्वरूपांत तल्लीन झाली आहे !

**गुलछबू**:—नाथा, आलें गडे. माझ्या पंचप्राणांचीच आरती तुम्हाला ओंवाळतें. ( नाटकराव जवळ जातो. ) उभें राहून पाय नाहीं का दुखत ? काय म्हणायचं ?—तूं मला आलिंगन देऊन आपल्या हातांनीं धरून बैठकीवर बसवशील तरच माझा थकवा जाईल ? वा ! हें काय मला सांगायला का हवं ? यायचं. ( नाटकराव आपला हात तिच्या हातांत देतो. ती त्याला लोडाशीं बसवून आलिंगन देते. )

**नाटकरावः**—प्रिये, मी तुला आठ दिवस व्यर्थ त्रास दिला. मला क्षमा करशील ना ?

**गुलछबूः**—अहाहा, माझा सगळा संताप नाहींसा झाला. पण नाहीं झाला जा ! ( उभी राहते. ) मी रुसणार आपल्यावर !

**नाटकरावः**—नको. प्रिये, मला क्षमा कर. ( गुडघे टेकून तिच्या हाताचें चुंबन घेतो. गुलछबू ओलाव्याच्या स्पर्शानें सावध होते. )

**गुलछबूः**—कोण, प्राणनाथ ! आपणच का ते ? केव्हां यायचं ? मला कसं कळविलं नाहीं ? मी दारापर्यंत घ्यायला नसतें का आलें ?

**नाटकरावः**—अग, तूं आपल्यांतच रंगून गेली होतीस तेव्हांच मी आलों. प्रिये, तूं मला धन्य केलेंस. मी तुला त्रास—मला क्षमा कर.

**गुलछबू**—इश्श ! हें काय ? गंगा उलटी का वाहील ? मग इकडे माझं वेड पाहायचं झालं तर ? किती वेळ पहायचं बरं ?

**नाटकरावः**—अगदीं आरंभापासून तों या वेळपर्यंत !

**गुलछबूः**—हाय, हाय ! इकडे तिष्ठत उभं राहावं लागलं ना ? घे सटवे शिक्षा ! ( मारून घेणार तोंच नाटकराव हात धरतो. )

**नाटकरावः**—हां, हां, हें काय भलतेंच. वेडी कुठली. अग मी तिष्ठत उभा नसतों तर हा प्रेमाचा सोहाळा मला पहायला कसा मिळता ?

**गुलछबूः**—नाहीं गडे ! सोडायची मला ! मीं आपला अपमान केला ! आपल्या नाजूक पायांना शिणविलें ! मला मेलीला शुद्ध कशी नाहीं ? चांडाळणी, प्रत्यक्ष नाथाला छळतेस काय ? घे-( तोंडांत मारून घेणार तों नाटकराव पुनः हात धरतो. )

**नाटकरावः**—अग, नको. मी थकलों नाहीं. असा त्रागा करशील तर मात्र मला राग येईल-नव्हे-आला आहे.

**गुलछबूः**—( रडत ) आपणास माझा राग आला ? माझा राग— ( हुंदके देते. )

**नाटकरावः**—आतां कसं करूं ? इथें डाक्टरही नाहीं. हं, आतां असं केलं पाहिजे. ( उघड ) गुलछबू, माझ्या प्रेमाचा तुला हुकूम आहे ! मजकडे पहा ! ( तसं करते. ) प्रेमाचा हुकूम गळ्यांत मिठी ! ( मिठी मारते. ) प्रेमाचा हुकूम रडायचं नाहीं, हुंदके द्यायचे नाहींत, प्रेमाच्या गुलगुल गोष्टी बोलायच्या !

**गुलछबू**:—( उभी राहून ) नाथा, झालें तें झालें. आतां एकमेकांवरचा राग विसरू या ( पोशाख पाहते. ) अगबाई, हा पोशाख आतांच मी पहातें आहें. केव्हां करायचा ? इश्श, अगदीं विचित्र-( स्वगत ) चुकलें ! आतांच घोंटाळा होणार होता ! ( उघड ) अगदीं विचित्रच आहे मी ! असा प्रेमाच्या रंगाचा लाल भडक पोशाख मला भारी आवडतो बाई ! ( निरखते ).

**नाटकराव**:—( स्वगत ) आतां हिला सोन्याचा छेडा पिंवळा दिसणार कीं तांबडा ? ओठ लाल नाहींत, डोळे तांबडे नाहींत ! आतां ही काय म्हणते कोण जाणे ! नेऊं, वेळ मारून नेऊं झालें.

**गुलछबू**:—अगबाई, घब्याळाचा छेडादिखील तांबूसच दिसतो आहे. पण ओंठ कां फिकट ? इश्श काळजी कशाला ? मी करतें तांबडे त्यांना. रेवडी, अग मेले रेडे-म्हशे (ती धाईनें येते.) जा, पळत विड्याचं तबक आण. पण हें काय ? डोळयांत कांहीं प्रेम दिसत नाहीं तें !

**नाटकराव**:—मी मुद्दाम या उणीवा राखून आलों होतों. कारण डोळे, ओंठ, आणि गाल या तीन अवयवांना रंगविण्याचा मक्ता बायकांनांच पुरुषांनीं दिला पाहिजे. शिवाय हीं आंगें बायकांच्या विशेष हक्काचीं, तेव्हां आपल्या हक्काच्या जमिनीवर बायकांनींच प्रेमाची पेरणी केली पाहिजे. हं, उचल, आपल्या हाताचा नांगर उचल !( रेवती साहित्य घेऊन येते. )

**गुलछबू**:—आतां असं बसायचं गडे. ( दारू पाजते. )

**नाटकराव**:—आतां थोडक्यांतच डोळ्यांवर प्रेमाचा रंग चढून प्रेमरसाच्या गुंगीनें ते ‘ प्रेम आंधळें ’ ही म्हण खरी करणार ! [ गळयांत हार घालते.]

**नाटकराव**:—तुझा आलिंगनहार थोडक्यांत गळ्यांत पडणार त्याची हा हार पूर्व सूचना देत आहे.

[ तोंडांत विडा देते. ]

**नाटकराव**:—माझ्या ओठांत तुझे ओंठ लवकरच उडी टाकणार आणि माझ्या ओंठाला तांबडा रंग देणार, अशी हा विडा मला सूचना देत आहे.

**गुलछबू**:—( दोन्ही हातांनीं त्याचे गाल धरून ) आतां माझे नाथ किती सुंदर दिसताहेत म्हणून सांगूं ?

**नाटकराव**:—आला, गालांवर प्रेमाचा रंग चढला! ( उठून तिचा हात धरून ) सुंदरी, मी प्रेममय झालों-पूर्ण प्रेममय झालों! त्यांत तुझें हें तांबडें

प्रेमळ पातळ, हें तांबडें प्रेमळ पोलकें, असा हा तुझा माझा प्रेममय पोशाख पाहून व तुझें माझें असें अगाध प्रेम पाहून सारे लोक आपला हेवा दावा करतील. नाहीं बरें ?

**गुलछबूः**—होय गडे. आणि या मेल्यांची आपल्या प्रेमाला दृष्टिही लागेल. इथनं चलायचं गडे. पण थांबायचं. यांची लागली असली दृष्ट तर तिच्या नांवानें तोडगा करतें हं.

[ लोकांवर बोटें मोडून व तोंडानें पुटपुटत त्याला घेऊन जाते. ]

---

# अंक तिसरा



## प्रवेश १ ला.

[ दिवाणखाना—वसंतराव लिहीत बसला आहे. ]

**वसंतरावः**—नटेशाची चौकशी होऊन निकाल लागेपर्यंत त्याला सस्पेन्ड करावें असा डायरेक्टरांकडून मला हुकूम आला आहे, त्याप्रमाणें त्याला सस्पेन्ड करूं कीं डिटेक्टिव्हच्या म्हणण्याप्रमाणें अजूनही चालढकल करूं ? डायरेक्टर माझे वरिष्ट आणि डिटेक्टिव्ह हितकर्ता ! आतां ऐकूं कोणाचें ? मी आपलेकडून सर्व प्रकरण सुसंगत आणि सविस्तर लिहून त्यांच्याकडे पाठविलें आणि त्यांचें हें उत्तर असें आलें. आतां वरिष्टांचें ऐकणें हें केव्हांही जास्त बरें ! जास्त बरें खरें, पण त्यामुळें कांहीं घोटाळा होऊन चौकशीच्या कामांत विघ्नें आल्यास अर्थात् डिटेक्टिव्ह साहेब आमच्यावर गरम होणार आणि तेंही रास्तच आहे ! सस्पेन्ड करण्याबद्दल हुकूम तर लिहून ठेवला आहे. आतां डिटेक्टिव्हसाहेबांची सल्ला घेऊन त्याची अंमलबजावणी करावी हेंच श्रेयस्कर आहे. नटेश तरी काय उलट्या काळजाचा प्राणी आहे ! तुरुंगांत खडी फोडण्याची पाळी आली असतांना त्याच्या चेहऱ्यावर उदासीनतेचें तर नांवच नको, पण उलट बेशरमपणांत आणि उद्धट वर्तनांत मात्र अधिकाधिक उन्नति होते आहे. इकडे बँकेंत माझ्याशीं त्याचें असें वर्तन आणि तिकडे नाटकरावाशीं त्याची वाढती सलगी पाहिली म्हणजे माझा जीव अतिशय काळजींत पडतो. नाटकरावाला त्या दुष्टानें मदिरेचें व्यसन तर लावलेंच. आणखी त्यावर वृश्चिक दंश करावा म्हणूनच कीं काय, त्या गुलछबूच्या जाळ्यांतही त्यानें त्यास पूर्णपणें अडकवून टाकला आहे. मी नुकतच ऐकलं कीं त्यानें गुलछबूस स्वतांच्या वाड्यांतच आणून ठेविली आहे. माझा स्नेही म्हणवून त्यानें माझ्याशीं इतकें कपटाचें आणि हलकटपणाचें वर्तन कां ठेवावें बरें ? किंवा कां ठेवावें याचें उत्तर असेंच असेल कीं, या गोष्टी मला कळवून तो करूं म्हणेल, तर माझी संमति त्यास कधींही मिळणार नाहीं हें त्याला ठाऊक आहे. शिवाय नटेशचीही त्याला सल्लामसलत सारखी मिळतेच आहे. बिचारी रमा वहिनी ! रूपानें चांगली, गुणांनीं उत्तम आणि स्वभावानें गंगेसारखी शुद्ध आणि भोळी ! परंतु आमच्या नाटक्याला तिची काय किंमत असणार ? त्याला नुसतें नाटक हवें असतें. लहानपणापासून त्याचा हा गुण पाहून त्याला आम्ही सारे सवंगडी नाटकराव म्हणूं

लागलों. परंतु त्या नांवाचा असा दुःखपर्यवसायी परिणाम होणार हें पाहून मला कितीतरी दुःख होत आहे. त्याला मोकाट सोडा असें डिटेक्टिव्हसाहेबांचें म्हणणें आहे; कारण मग त्यांना नटेशवर आणि नाटकरावांवर दोघांवरही उत्तम नजर ठेवतां येईल. मला तर असें वाटतें, त्याच्याशीं खोटं भांडण करून कांहीं दिवस त्याचा आपला स्नेहसंबंधच वर्ज करावा, म्हणजे माझें जें काय थोडें बहूत त्याच्या मनावर दडपण असेल तेंही नाहींसें होईल आणि मग त्याला नकळत राजरोस त्याच्यावर नजर ठेवतां येऊन मला त्याचा बचाव करतां येईल. आज तो चहा घेण्यासाठीं आल्याबरोबर त्याच्याशीं भांडण काढायचें हें ठरलं ( पुनः टेबलाशीं जाऊन कांहीं तरी लिहूं लागतो, इतक्यांत सुशीला हळूच येते. )

**सुशीलाः**—( एकीकडे ) स्वारी लिहिण्यांत दंग आहे तोंवर जाऊन हळूच डोळे झांकावे. आज पुनः नटेशबद्दल सांगून पहाणार आहें. ऐकलें तर फारच बरें होईल. नटेशची जागा कायम राहिल्यास तो संतुष्ट होईल, आणि मग त्याची बाकी देऊन टाकून त्याजपासून तो दस्तावेज परत मिळाल्यास माझ्यावरच्या संकटाचें मूळच मुळीं माझ्या हातीं येईल. माझ्या हातीं आल्यावर मग मी ठेवतें आहें कशाला तो! मेल्याला चुलखंडांत टाकून एकदांची आणि सदाची निर्घोर होईन. नोकरी न गेल्यास आणि बाकी दिल्यास कागद परत मिळेल असें त्याच्या बोलण्यावरून त्या दिवशीं दिसलें. तेव्हां आतां पुनः शेवटचें सांगून पहावें! ( हळूच जाते. वसंतरावास ती येतांना आरशांतून दिसते. तिचा बेत ओळखून तो जवळ आल्याबरोबर मागें वरचेवर तिचे हात धरून तिच्याकडे वळतो आणि हंसतो.)

**वसंतरावः**—हां! चोर पकडला कीं नाहीं ? तुमचा सारा बेत या बेट्या आरशानें मला सांगितला!

**सुशीलाः**—तो तरी मेला पुरुषच कीं नाहीं ? बरं, म्हटलं चहा प्यायला फुरसत झाली का ?

**वसंतरावः**—म्हणजे मी केव्हांचा मुळीं वाटच पाहतों आहें. टाकला तरी आहेना कीं आपलं—

**सुशीलाः**—किटलींतून कपांत तेवढा टाकायचा राहिला आहे. ( जाते. )

**वसंतरावः**—( स्वगत ) अलीकडे हिची चित्तवृत्ति अंमळ बावरलेली आणि उदास दिसते आहे. विचारलं तर धडपणें सांगत नाहीं. बायकांच्या स्वभावांत ही मोठी गोम असते बोवा! ( सुशीला चहा घेऊन येते. )

**सुशीलाः**—( तो चहा पीत असतांना ) म्हटलं, नाटकभाऊजी केव्हांसे यायचे आहेत ?

**वसंतरावः**—येतों म्हणून म्हणाला आहे. पहावं केव्हां येतो तो. नटेशनं विश्रांति दिली असली किंवा त्या हलकट रांडेच्या नाटकी प्रेमांतून सवड झाली, तरच त्याला तुमची आमची आठवण होणार. मी तर बोवा निश्चय केला आहे कीं आज तो आला म्हणजे त्याला साफ सांगायचं कीं तुझा माझा अतःपर कांहीं संबंध नाहीं म्हणून ! आणि म्हणूनच आज हे कामाचे कागद जरा एकीकडे ठेविले आहेत !

**सुशीलाः**—हें काय बरं ? नटेशच्या पाशांत ते असे अडकले असतांना आपण त्यांना सोडवायच्या ऐवजीं उलट त्यांचा संबंधच सोडणें हें बरं दिसेल का ?

**वसंतरावः**—तूं मोठी उतावळी ! चटकन् अभिप्राय—निकाल–टोमणा देऊन पार !

**सुशीलाः**—बरं गडे, माझी चूक झाली. असं वागण्याचा हेतू काय तो तरी कळवावा !

**वसंतरावः**—अशी वाटेवर ये म्हणजे सारं सांगतों ! डिटेक्टिव्हसाहेबांनीं मला सांगितलं आहे म्हणजे सल्ला दिला आहे कीं, नटेश आणि नाटकराव या दुकलीवर जणूं तुमचें फारसें लक्ष नाहीं असें वर वर दाखवा म्हणजे त्यांना ऐन गुन्हा करीत असतांना पकडण्यास सोपें जाईल. त्यावरून मला असं वाटलं कीं स्नेह कायम ठेऊन लक्ष नाहींसं दाखविलं म्हणजे नाटकरावाच्या जरी नाहीं तरी त्या धूर्त नटेशच्या लक्षांत ही लबाडी आल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हां मुळीं भांडण झालेलें दाखविलें म्हणजे मग नाटकरावासही शंका नको आणि त्या नटेशरावाचीही भीति नको ! आंतून त्यांच्यावर सक्त नजर ठेविली म्हणजे झालं !

**सुशीलाः**—हें बाई मला काय ठाऊक ? असं असेल तर माझं कांहीं म्हणणं नाहीं. ( दोघें स्तब्ध राहतात. )

**सुशीलाः**—( थोड्या वेळानें उदासपणें ) नाथ,

**वसंतरावः**—( गंभीरपणें ) सुशीले, तुला अशी उदास पाहिली म्हणजे कसलं तरी दुःख तुला होतं आहे आणि तें तूं मजपासून लपवीत आहेस अशी मला शंका येते. माझ्या कष्टाच्या दिवसांत तुझा चेहरा नेहमीं हंसतमुख राहिला आणि आतां सुखाचे दिवस उजाडले असतांना तो असा म्लान कां बरं असावा ?

**सुशीलाः**—माझी शेवटची एक विनंति आहे—

**वसंतरावः**—शेवटची विनंति! सुशीले, शेवटची म्हणजे काय? तुला काय होतं आहे?

**सुशीलाः**—शेवटची म्हणजे यापेक्षां महत्वाची विनंति करण्याचें मला आजवर कधीं कारण पडलं नाहीं आणि पुढें पडेल असं मला वाटत नाहीं. म्हणून म्हणतें माझी शेवटची विनंती आहे. माझी बुलबुल—माझी चिमणी सदा हंसत खेळत असावी, सदा गाणीं गात प्रेमानें नाचत असावी, असं नेहमीं इकडे म्हणायचं ना? आपलं फुल पाखरूं असंच अल्लडपणें नेहमीं बागडत असावं ना?

**वसंतरावः**—अलबत्! आणि त्यांतच मला अत्यंत सुख आहे!

**सुशीलाः**—त्यांत दोघांलाही सारखंच सुख आहे. असं सुख सदासर्वकाळ टिकावं असं इकडे मनापासून वाटत असलं तर मी सांगतें असं करायचं. करायचं होईल ना? मला वचन द्यायचं!

**वसंतरावः**—पण मला आधीं काय तें कळल्याशिवाय मी वचन देणं बरं का? उगीच कां मला घाबरा करतेस? सांगेनास काय तें एकदमच?

**सुशीलाः**—नटेशची चौकशी तहकूब करावी. त्याला अगदीं दुखवूं नये. त्याला कामावरून सध्या काढूं नये.

**वसंतरावः**—मला ज्या माणसाची अत्यंत चीड, मला ज्या गुन्ह्याबद्दल पराकाष्टेचा तिरस्कार, ज्या प्रकरणाबद्दल तूं मला पुन्हा कांहींही म्हणूं नये अशी मी सक्त ताकीद तुला केलेली असतांना, ती गोष्ट पुनः मजसमोर बोलण्याचं धाडस तूं करावं ना? सुशीले, माझ्या आज्ञेचा असा अनादर आजपर्यंत तूं कधींही केला नाहींस!

**सुशीलाः**—माझी ही शेवटची विनंती ऐकायची गडे!

**वसंतरावः**—पण तुझा हा भलताच आग्रह कां? शिवाय नटेशच्या जागेची भरतीसुद्धां मी योजून ठेविली आहे.

**सुशीलाः**—इकडच्या हातांत सत्ता आहे. त्या माणसाची दुसरीकडे सोय लावतां येईल. पण नटेशला अगदीं दुखवूं नये. त्याला क्षमा करावी हीच माझी शेवटची विनंती आहे!

**वसंतरावः**—हा निवळ दुराग्रह आहे! रदबदली करण्याबद्दल त्यानें तुला म्हणावें, तें तूं निमूटपणें ऐकावें आणि मीही तसलाच मूर्खपणा करीन म्हणून तूं उमेद बाळगावी. असंचना?

**सुशीलाः**—नाथ, तसं अगदीं नाहीं. माझ्या विनंतीच्या मुळाशीं नाथांच्या हिताखेरीज दुसरं कांहीं नाहीं. नटेश अत्यंत भयंकर माणूस आहे. तो वेळेवर काय करील याचा अगदीं नेम नाहीं. तो अगदीं उलट्या काळजाचा आहे असं इकडे म्हणायचं असतं ना?

**वसंतरावः**—हात्तिच्या! एवढंच ना? मागें एकदां तुझ्या वडिलांवर त्यानें कांहीं किटाळ आणलं होतं त्याची आठवण झाली वाटतं तुला? पण वेडे, तुझ्या वडिलांत आणि माझ्यांत पुष्कळ भेद आहे. तुझ्या वडिलांवर किटाळ आणण्यांत नटेशचा जरी निवळ दुष्ट हेतू होता तरी त्या आरोपांत थोडें सत्यही होतें हें तूं विसरूं नकोस ईश्वरकृपेनें माझी अब्रू अद्याप स्वच्छ आहे आणि ती नेहमीं राहील!

**सुशीलाः**—संसारांतील दिवस सुखानें जाऊं लागले म्हणजे सुखमय झालेल्या मनाच्या एका कोपऱ्यांतच भावी दुःखाच्या नसत्या संशयाची कल्पना दडी देऊन बसलेली असते. या चालत्या सुखाच्या संसाराला कसली खीळ बसणार नाहींना अशी भीति नेहमीं त्या सुखी मनाला त्रास देत असते. नाथ, आपला सुखाचा संसार पाहिला म्हणजे नटेश सारख्या दुष्ट आणि भयंकर माणसाच्या द्वेषाचें विष आपल्या सुखांत कालविलें जाणार नाहींना, अशी मला सारखी भीती वाटत आहे. (छातीवर डोकं ठेऊन) मला या प्रेमळ अंतःकरणाच्या उशीवर नेहमीं असंच डोकं टेकायला मिळावं, त्यांत कधींही विघ्न येऊं नये म्हणूनच मी ही विनंति करीत आहें.

**वसंतरावः**—बायका जितक्या कोमळ मनाच्या तितक्याच त्या मूर्ख असतात हेंच खरं! सुशीले, तुझ्या दुःखाच्या, भीतीच्या कल्पना अगदीं निराधार आहेत. नटेशसारख्या सर्पाशीं सलोखा ठेवणें पापभीरु माणसाला अगदीं अशक्य आहे. शिवाय साऱ्या बँकेंत नटेशला मी कामावरून बडतर्फ करणार असें जाहीर झालें आहे. आतां यानंतर मॅनेजरसाहेबांनीं आपल्या बायकोच्या कह्यांत येऊन नटेशची नोकरी बहाल केली, असली लाजिरवाणी प्रसिद्धी होऊं देऊं काय?

**सुशीलाः**—लाजिरवाणी! तशी होऊं दिली तर मानहानी होईल का?

**वसंतरावः**—अर्थात् होईल! माझ्या मनावर सत्यासत्य विवेकापेक्षां इतर बाह्य गोष्टींचें दडपण पडूं शकतें, अशी मी सर्व लोकांची समजूत होऊं देऊं का? मला त्याचे लवकरच परिणाम भोगावे लागतील! आधींच नटेशची सलगी मी कशी सहन करतों म्हणून लोकांत चर्चा होत आहे, आणि आतां त्याला शिक्षा

करण्याच्या ऐवजीं त्याच्या अपराधावर मी पांघरूण घालूं लागलों तर माझी कांहीं तरी किंमत लोकांत राहील का?

**सुशीलाः**—कसली सलगी करतो तो? नुसता नांवानें कधीं कधीं हांक मारतो हीच सलगी ना? त्यांत काय झालं? लहानपणीं बरेच दिवस इकडे आणि तो सहाध्यायी होते हें साऱ्यांनांच ठाऊक आहे. म्हणून तेवढयानें थोर लोकांची किंमत कशी बाई कमी होईल? थोर लोकांचं मन असल्या क्षुद्र गोष्टींचा विचारच करीत नाहीं. उगाच थट्टेनें म्हणायचं ना हें?

**वसंतरावः**—थट्टा! मुळींच नाहीं. सुशीले, इतर वेळेस तुझें म्हणणें मला मान्य आहे पण व्यवहारांत म्हणजे अधिकार आणि साधन, धनी व चाकर, हुकुम आणि बजावणी, असल्या सेव्य सेवक भावनेमध्यें एक केसभरही सलगी झाली कीं अधिकाऱ्याची किंमत व्यवहारांत कमी झालीच समज. शुद्ध व्यवहारांत पुष्कळशा नैतिक कल्पना अशा आहेत कीं त्यांची भेसळ करणें म्हणजे व्यवहार बुडणें होय, असेंच व्यवहारज्ञ समजतात; आणि त्याच भावनेनें मी बोलतों आहें.

**सुशीलाः**—माझ्या मनाला सरळ वाटलं तें मी बोललें! मला अद्याप असं वाटतं कीं हा मनाचा कोतेपणा आहे. प्रिया, समंजस लोकांना मॅनेजरसाहेब कोत्या मनाचे आहेत, असं इकडे नका हो म्हणूं देऊं. मला त्यापासून अत्यंत दुःख होईल!

**वसंतरावः**—काय? मी मनाचा कोता आहें असंच ना तुझं म्हणणं?

**सुशीलाः**—इश्श, असं माझ्या स्वप्नांतही मी येऊं येणार नाहीं. इकडे तसं नसायचं म्हणून आणि इकडे तो कलंक लागूं नये म्हणूनच मीं तसं बोललें!

**वसंतरावः**—( रागानें ) कांहीं म्हटलंस तरी भावार्थ तोच आहे. बरं तसंच कां होईना! ( घंटी वाजवितो. )

**सुशीलाः**—काय आलं आहे मनांत? काय हवं? ( विठ्या येतो. )

**वसंतरावः**—हें पाकिट घे. बँकेंत जा आणि हेडक्लार्कला दे. (विठ्या जातो.)

**सुशीलाः**—काय आहे त्या पाकिटांत?

**वसंतरावः**—नटेशच्या सस्पेंडीचा हुकूम आहे त्यांत. त्याला चार महिने सस्पेंड केलें आहे.

**सुशीलाः**—( घाबरून ) नाथ, काय केलं हें? त्याला परत बोलवा. माझ्या साठीं–तुमच्या बुलबुलाच्या–चिमणीच्या प्रेमासाठीं ही अखेरची भीक मला घाला.!

आपण होऊन आपल्या सुखांत माती कालवूं नका. हाय, हाय, प्रिया, त्या सर्पाच्या शेपटीवर पाय देण्याची बुद्धि तुम्हाला कशी हो झाली? आतां आमच्या संसाराचं कसं होईल ? त्याला परत बोलवायचं !

**वसंतरावः**—तो गेलादेखील ! आतां आपल्या हातीं गोष्ट राहिली नाहीं. तीर निघून गेला !

**सुशीलाः**—( स्तब्ध होते ) खरं आहे ! आतां आपल्या हातीं गोष्ट राहिली नाहीं. तीर निघून गेला ! !

**वसंतरावः**—( गोंजारतो ) असं काय करावं बरं ? माझ्याबद्दलच्या तुझ्या उत्कट प्रेमानेंच तुला असं बोलायला लावलं, आणि त्याप्रेमामुळंच माझ्या सुखावर केव्हां धाड येईल याबद्दल तुला व्यर्थ धास्ती वाटते आहे, हें मला माहित का नाहीं ? प्रेमोत्कटतेमुळेंच माझी तूं अमर्यादा केलीस म्हणूनच मी तुला क्षमा करतों. परमेश्वर तुझ्या प्रेमाबद्दल तुझ्या संसारांत मिठाचा खडा कधींही टाकणार नाहीं. नटेशची धास्ती सोड. वाटेल तसले घाले तुझ्यामाझ्यावर तो घालूं दे ! त्याच्याशीं झगडण्याला मी पूर्ण समर्थ आहें. माझ्या लाडकीच्या प्रेमाच्या बळावर वाटेल तें संकट आणि वाटेल तो स्वार्थत्याग करायला मी कधींहीं मागें पुढें पाहणार नाहीं. मर्दाला योग्य असें धैर्य माझ्या अंगीं आहे असं तुला केव्हांही दिसेल !

**सुशीलाः**—असला प्रसंग येऊं नये—नाथ, मला नटेशची भयंकर भीति वाटते. त्याचं विष भयंकर आहे, तो एकदा चिडल्यावर माझा, इकडचा, नाटकभाऊजींचा, रमाबाईंचा अगदीं निरनिराळा छळ करील बरं का ! देवा, आमच्यावर कृपा कर. आमचा सोन्यासारखा संसार तुला बघवत नसला तर आम्हां दोघांनाही बरोबरच या जगांतून उचलून घेऊन जा; पण जिवंतपणीं आमचा विरस करूं नको !

**वसंतरावः**—नाहीं, तो परम कारुणिक परमेश्वर माझी व्यर्थ कसोटी कधींही पहाणार नाहीं !

**सुशीलाः**—हेंच तें. मी तरी हेंच म्हणतें. देवानें आमची कोणाचीही कसोटी पाहूं नये !

( नाटकराव येतो. )

**नाटकरावः**—'ऐन सुखाच्या समयीं आलों, प्रथमच फसलेंसि मना, उगीच कां अतां हळहळसी.' अगदीं गौतमी आत्याबाईसारखा आलों नाहीं रे ? जेव्हां जेव्हां

मी येतों, तेव्हां तेव्हां तुमचं हेंच चाललेलं असतं. देवा, मला कां नाहीं रे असं सुख दिलंस ?

**वसंतरावः**—अहो उल्लू, जरा प्रसंग ओळखून वागावं माणसानं !

**नाटकरावः**—( दोघांकडे पाहून ) म्हणजे ! तुम्ही दोघें मघांशीं भांडत होतांनीं काय ? वहिनी चे डोळे असे तांबडे, तुझा चेहरा हा असा ! हें आहे तरी काय ? ( कोणी बोलत नाहींसें पाहून एकीकडे ) आज कांहीं निराळाच रंग दिसतो आहे. ( उघड ) वहिनी, तुम्ही तरी कांहीं सांगा—छे बुवा, हा तोंड बांधून बुक्यांचा मार नाहीं सहन होत मला ! ( गुढघे टेंकून ) मी चुकलों बरं वसंतराव, वहिनी क्षमा करा आणि दोन शब्द बोला !

**वसंतरावः**—तुझं नाटक बंद कर आणि आधीं नीट त्या खुर्चीवर बैस. (नाटकराव तसं करतो. ) अस्सं. हं, असा थंडावूं नकोस. अहो, गरम गरम चहा आणून यांना थोडं गरम करा ! ( सुशीला जाते. )

**नाटकरावः**—वसंतराव आज तुझ्या मुद्रेंत प्रेम कांहीं दिसत नाहीं. तुझा असा प्रेमशून्य चेहरा पाहिला म्हणजे मला कसंसंच होतं. आमची प्रेमा नेहमीं अशीच तुझ्यासारखीच मजकडे बघत असते !

**वसंतरावः**—नाटकराव, तूं शुद्धीवर कधीं येणार बोवा ? तूं हे नानाढंग जे आरंभले आहेस ते कधीं सोडणार ? मला कांहीं कळूं द्यायचं नाहीं हा तुझा निश्चय होता, पण मला सारं कळून चुकलं आहे.

**नाटकरावः**—अरे, मीच तुला सारं कांहीं सांगणार होतों. पण आमच्या प्रेमा बाईला धीर निघाला नाहीं. आमच्या चहाच्या ती इथं येऊन करते आणि तुम्ही दोघेंही आपला गैरसमज करून घेतां, याला मी तरी काय करावं ? प्रेमानं तुम्हाला आणखी काय काय सांगितलें ? तिचा मुळीं गैरसमज झाला आहे सारा !

**वसंतरावः**—अरे, धडधडीत हलकटपणाच्या आणि विश्वासघाताच्या गोष्टी तुझ्या हातून घडत असतांना आणि प्रत्यक्ष बिचाऱ्या रमावहिनीवरती तुझा जुलूम चालू असतांना तुझी कानउघाडणी करण्यासाठीं आमचे जवळ—तुझ्या मित्रांजवळ एक शब्दसुद्धां न बोलतां तुझा नाश तिनें आपल्या जागत्या डोळ्यांनीं पहावाना ? मूर्खा, हलकट रांडांना घरांत थारा देतोस, बेसुमार दारू पितोस, नटेशसारख्या महापातकी दगलबाज माणसांवर विश्वास ठेवतोस, नटेशच्या सांगण्यावरून माझ्या जवळ राजरोस प्रतारणा करतोस, हा सारा आमचा

गैरसमजच म्हणावयाचा ना? दे, गैरसमजांना दूर करणारं उत्तर दे. आहे कुठें तोंड उत्तर द्यायला?

**नाटकरावः**—मित्रा, गुलछबूचं मजवर प्रेम किती आहे हें जर तुला समजलं असतं तर तूं मला अशीं खेटरं मारलीं नसतींस. प्रेमाबाईत आणि तिच्यांत जमीन अस्मानाचं अंतर आहे!

**वसंतरावः**—तुझ्याच शब्दांत सांगायचं म्हणजे गुलछबूचं तुजवर प्रेम किती आहे हें जर तुला कळलं असतं तर तूं अशीं खेटरं खाल्लींच नसतींस. प्रेमाबाईत आणि तिच्यांत खरोखरच जमीनअस्मानाचं अंतर आहे. रमावहिनी ही निर्मळ अस्मानांतला अरुंधतीचा तारा आणि गुलछबू हा जमिनीवरील पापाच्या दलदलींतला काजवा! हो–हो अगदीं असंच! ( सुशीला चहा घेऊन येते. ) तुझा मला अगदीं तिरस्कार आला आहे!

**नाटकरावः**—वहिनी, तुम्ही आतां माझा न्याय करा. तुम्हालाही सारं कळलेलंच आहे.

**वसंतरावः**—वहिनी काय तुझं टाळकं न्याय करणार आहे? म्हणे न्याय करा. जिथं इथून तिथून सारा अन्याय, तिथं तिनं झालं तरी काय न्याय करायचा आहे रे? सुशीले, तूं कांहीं म्हण पण असल्या दारूबाज आणि बाहेरख्याली माणसांची संगत यापुढें मी अगदीं ठेवणार नाहीं. आजपर्यंत तुझ्या म्हणण्यासाठीं म्हणून या बेमुर्वतखोर उल्लू माणसाचा सहवास मीं पत्करला, पण आतां यापुढें मी तुझंही ऐकणार नाहीं. अरे, एक वेळ मी नुसत्या तुझ्या बाहेरख्यालीपणाबद्दलसुद्धां गय केली असती, पण तूं दारूही प्यायला लागला आहेस. या दारूच्या पायीं काय काय अनर्थ होतात, हें विद्याहरणांतील दैत्यगुरूच्या पौराणिक उदाहरणावरून व गडकऱ्यांच्या सुधाकराच्या आजकालच्या सामाजिक उदाहरणावरून तरी तुला कळायला हवं होतं. इतक्यावरच तूं थांबला नाहींस तर हीं सारीं पापं करूनही त्या साध्वीचा–त्या पुण्यगंगा रमावहिनीचा पदोपदीं अनादर करतो आहेस, छळ करतो आहेस. यामुळें तर तुझा मला अत्यंत तिरस्कार आला आहे; इतका कीं तुझा माझा संबंध साफ तोडून टाकावा असं वाटतं.

**नाटकरावः**—तुझ्या मनांत तसं आलं असेल तर तसंही होऊं दे. शुद्ध प्रेमाच्या मागें मी लागलों हें कांहीं पाप नव्हे, किंवा शुद्ध प्रेमाच्या सरोवरांतील त्या हंसीला—त्या माझ्या प्रेममूर्ती गुलछबूला—मी घरांत आणून ठेवलें, यांत मी मुळींच कांहीं वावगें किंवा पाप समजत नाहीं. यांत मी कोणाचा घातपात केला

नाहीं, कीं कोणाची ठेव बुडविली नाहीं. वसंतराव, आपल्यावर प्राणापलीकडे प्रेम करणाऱ्या व्यक्तीला—केवळ ती लग्नाचा फार्स करून झालेली बायको नाहीं या पोकळ सबबीवर—समाजाच्या या मूर्खपणासाठीं मी गुलछबूचा तिरस्कार करूं काय? मीही तुला पौराणिक उदाहरण सांगतों कीं माझी गुलछबू म्हणजे साक्षात् महानंदा आहे—महानंदा! माझ्या गुलछबूला माझी सेवा म्हणजे शिवभक्तीच वाटते!

**वसंतरावः**—तूं म्हणतोस तसली ती महानंदाही नाहीं आणि प्रेमसरोवरांतील हंसीही नाहीं. रमावहिनीच्या योग्यतेचा लक्षांशही तुझ्या महानंदेंत आणि हंसींत नाहीं, हें खास समज. नाटकराव जिला तूं महानंदा समजतोस, जिला तूं हंसी समजतोस ती तुझ्या मनाची, अब्रूची, संपत्तीची मनुष्यरूपी जळू व प्रेमशून्य दगलबाज बगळी आहे, याचा अनुभव तुला आल्याखेरीज रहाणार नाहीं. आणि हा अनुभव तुला येईपर्यंत मी तुझ्याशीं कसलाही संबंध ठेवणार नाहीं. इतकेंच नव्हे तर नाटकराव ही व्यक्ति तरी जगांत आहे कीं नाहीं याचें मी स्मरणही कधीं करणार नाहीं. सुशीले, माझं डोकं दुखूं लागलं. पापी माणसांच्या नुसत्या सहवासानेंही माझी प्रकृती बिघडते हें तुला ठाऊकच आहे. मी जाऊन स्वस्थ पडतों. माझ्या खोलींत घटकाभर कोणींही येऊं नका—नाटकराव, सध्याचा मार्ग सोडून मी मागें सांगितल्याप्रमाणें वागायचं असेल तरच तुझा माझा स्नेह कायम राहील. नाहींतर यापुढें तुमच्या आमच्या स्नेहाला नमस्कार! या आतां! सुशीले तूं इथं उभी राहूं नकोस; आपल्या उद्योगाला लाग. ( तो जातो—सुशीला जाते—नाटकराव खिन्न मुद्रा करून त्यांच्याकडे पहात राहतो—ते गेल्यावर हंसतो. )

**नाटकरावः**—झालं हें एकपरी बरं झालं! उगीचच मला आपला यांचा धाक होता. आतां मला दाही दिशा मोकळ्या झाल्या! गुलछबूची संगति सोडून नीतीच्या लांब लांब गप्पा सांगणाऱ्या या बजरबट्टूची संगति हवी आहे कोणाला? उगाच स्नेहाखातर भीड वाटत होती. छान झालं! तीही आतां नाहींशी झाली! आतां एका अंगाला मदिरा आणि दुसऱ्या अंगाला मदिराक्षी. बस, तिसरी गोष्ट नाहीं! हवा तितका पैसा, नटेशसारखा मित्र, गुलछबूसारखी रमणी, मदिरेसारखं प्रेमरसायन, आणि माझ्यासारखा प्रेमाचा भुकेला! हें प्रेमपंचायतन एका ठिकाणीं जमल्यावर स्वर्गांतील नंदनवनांतलीं सुखें पृथ्वीवरच्या नाटकरावाच्या वाड्यांत नाचत येतील तर त्यांत नवल काय?

[ जातो. पडदा पडतो. ]

---

# अंक ३ रा

## प्रवेश २ रा

[ स्थळः—गोट्याचें घर. गोट्या येतो. ]

**गोट्याः**—बायको म्हातारी झाली, पण मी कांहीं अद्याप म्हातारा झालों नाहीं. पहिली बायको म्हातारी झाली म्हणून मी दुसरी एक तरुण बायको केली. हो, सहाजिकच आहे. पुरुषांना काय, हव्या तितक्या लग्नांची मोकळीक आहे. पण हें दुसरं लग्न करून मी सुखी झालों का ? हो. सुखी झालों आणि दुःखीही झालों. जितका सुखी तितका दुःखी ! तरूण बायको जवळ असली म्हणजे सुख वाटतं. हो, साहजिकच आहे. पण ती जख्खड बायको जेव्हां का आपलं म्हातारं प्रेम पाघळायला लागते तेव्हां तिला सुख होतं ! हो, साहजिकच आहे. पण मला किळस येऊं लागतेना ! हीं दोन लग्नें करून माझ्या मागें त्रास किती लागला आहे ? यापेक्षां असं वाटतं कीं एकटी म्हातारी बायकोच बरी होती. बाकी हें खरं कीं पोटाच्या सैंपाकाला म्हातारी व ओंठांच्या सैंपाकाला तरणी बायको. हो, साहजिकच आहे. मी देखील काय रंगेल गडी. तरणीबरोबर तरुण व म्हातारीबरोबर म्हातारा ! हो, अगदीं गोकुळांतल्या कृष्णाप्रमाणें. शिवाय माझं असं आहे कीं केल्या दोन बायका तर केल्या, आतां काय त्याचें ? पण दोघींवर प्रेम अगदीं सारखं करायचं ! शिवरात्रीला शिवलीलामृत ऐकलं. त्यांत पुराणिकबोवा म्हणाले ती ओवी मला अद्याप पाठ आहे—'दोघी स्त्रिया करून । एकीचेंच राखी जो मन । तो गोचीड होय जाण । कुत्र्याच्या अंगीं चिकटतसे ॥ १ ॥ ' हे शब्द ऐकल्यापासून भ्यालों आणि दोघींवर सारखें प्रेम करूं लागलों. इतकेंच नव्हे तर ओवीप्रमाणें अक्षरशः दोघींचें मन राखूं लागलों. हें पहा. म्हाताऱ्या बायकोच्या आज्ञेप्रमाणें ही एक पांढरी मिशी. तरुणीच्या इच्छेखातर बादशाही खिजाब आणून दुसऱ्या मिशीला कलप करून तिला तरुण बनविली. डोकीचे अर्धे केस पांढरा कलप चोळून म्हातारे केले व अर्धे तरुण बायकोसाठीं काळे ठेवले. पांढरी भुंवई थेरड्या बायकोची, काळी तरुणीसाठीं. इतक्यावर देखील दोघांचें समाधान होईना तेव्हां एक बगल पांढरी व दुसरी काळी करावी लागली. त्यांचें समाधान झालें पण माझी ही विटंबना होत आहेना. पण करायचं काय, आपण हें सारें दुसऱ्यासाठीं का करतों ? आपल्या लाडक्या बायकोसाठींच हें सारें आहे. हो साहजिकच आहे. इथपर्यंत हें सारें निभावलें; पण गेल्या वर्षापासून मला एक नवीन काळजी

उत्पन्न झाली आहे. गेल्या सालीं म्हाताऱ्या बायकोचे पुढचे दोन दांत व खालच्या वरच्या चारी दाढा पडल्या आहेत. तेव्हां आतां ती माझ्या एकीकडच्या दाढा आणि दांत पाडून अर्धे तोंड म्हातारं करायला सांगते कीं काय? तिच्या प्रेमाखातर मला करावें लागणार. हो साहजिकच आहे. नाहीं तर गोचिडाचा जन्म! आणि तो कुत्र्याच्या आंगावर! नकोरे बुवा तो जन्म! देवाला शिक्षाच करायची झाली, तर मी सांगतों तशी तरी करावी. समजा, मी एकटीचेंच म्हणजे अर्थात् तरुण बायकोचें मन राखलें. हो, साहजिकच आहे. तर देवानें मला शिक्षा म्हणून कोणता जन्म द्यावा? किडामुंगीचाच जन्म देणें असेल तर माझी इच्छा आहे कीं त्यानें मला सुंदर स्त्रियांच्या जनानखान्यांत चिलटाचा जन्म द्यावा. चिलटांचा जन्म मिळाल्यावर मग काय, हवें तिथें चावावें. गाल चावावे, ओंठ चावावे, हनुवटी चावावी, आणि मग असेंच क्रमाक्रमानें खालीं दंश करीत प्रवास करावा. देवानें हीच शिक्षा अमलांत आणायचें जाहीर केलें तर मी तर तो अपराध करीनच, पण हे सगळे पुरुषसुद्धां दोन दोन लग्नें करून एकीचेंच मन राखण्याचा अपराध करायला चुकणार नाहींत. हो, साहजिकच आहे. ( पडद्यांत त्याला कोणी हाक मारतें.) हें कोण हांक मारतंय? तरूण बायको कीं म्हातारी? ( पुनः हांक ) अरेच्या दोन्ही हांक मारताहेत. आतां कोणीकडे जाऊं? आतां मला तुमच्यापैकीं कोणी सल्ला देईल काय? छे, कोण देणार? सगळ्यांना एकेकच बायको! ( तरुण येते. )

**तरुणीः**—केव्हांची नांवानें ओरडतें आहे. माझा मेला घसा फुटायची वेळ आली!

**गोट्याः**—तुझा घसा तूं आपल्या सवतीच्या वयाची झालीस म्हणजे फुटेल. मला तुझी हांक ऐकूं आली नाहीं.

**तरुणीः**—अगदीं खोटं! खोटं बोलायला लाज कशी नाहीं वाटत?

**गोट्याः**—अगदीं खोटं! मला लाज वाटते. लाज म्हातारपणीं नाहींशी होते. मी सध्यां तुझ्यापुरता तरुण आहें.

**तरुणीः**—मग मी इतक्या मोठ्यांदा हांक मारली, ती ऐकायला कशी आली नाहीं?

**गोट्याः**—अग, बरोबर आहे. तूं इकडून हांक मारलीस ना? झालं तर, हा माझा म्हातारा कान तुझ्या दिशेकडे होता. तुझ्या वांटणीचा इकडे होता.

[ म्हातारी येते. ]

म्हातारीः—बाई, बाई! शर्थ झाली माझ्या ओरडण्याची! असें ओरडतां ओरडतां माझा प्राणदेखील जायचा!

गोम्याः—छट, अगदीं खोटं. म्हातारड्या माणसांचा प्राण मोठा चिवट असतो. तूं घाबरूं नकोस. तूं खरंच का हांक मारलीस?

म्हातारीः—म्हणजे! पण खरंच का ऐकायला आलं नाहीं?

गोम्याः—नाहीं, खरंच नाहीं. तूं हांक मारते आहेस, असं समजल्याबरोबर मी, हो साहजिकच आहे, हिच्या वांटणीचा कान तुझ्याकडे होता तो तुझा म्हातारा कान तुजकडे वळविला. यामुळें कांहींच ऐकायला आलं नाहीं. हो, साहाजिकच आहे.

म्हातारीः—तुमच्या तोंडाला हाड नाहीं, झालं!

गोम्याः—तुझ्या तोंडावर मात्र ढळढळीत दिसूं लागलीं आहेत. म्हातारपण, हो, साहजिकच आहे!

तरुणीः—किती हो बोलतां त्यांना?

गोम्याः—अग बोलूं दे. तुझ्या वांटणीच्या तरुण नवऱ्याला ती कांहीं बोलणार नाहीं. ती आपली तिच्या वांटणीच्या म्हातारड्याला बोलते आहे. आतां हें पहा! तुम्ही मांजरीसारख्या भांडूं कांहीं नका. तुम्ही भांडायला लागलांत म्हणजे एका ठिकाणची वांटणी दोन ठिकाणीं करतां कीं काय अशी भीति वाटूं वाटते. तुमची वांटणी होईल, पण मी मात्र जरासंधासारखा मधोमध चिरला जाईन. तेव्हां चला, मी तुमची दोघांची समजूत घालतों. चला, आपापल्या वांटणीच्या हक्काच्या बगलेंत शिरा. ही पांढरी बगल तुझी. ही काळ्या केसांची तुझी (दोन्ही त्याला बेंगाटतात, इतक्यांत त्याला डॉ० नटेश बाहेर हांका मारतो.) हें कोण हांका मारतं आहे? (पुनः हांका) अरे हा जुना सैतान. आलों धनीसाब. (बगला उंच करून) चला पळा घरांत. मी येईपर्यंत भांडूं नका. अरे, पण हे धनीसाबच घरांत आले. अग ती घोंगडी आण अंथरायला. (डॉक्टर नटेश त्याच्या पाठीवर हात ठेवतो.)

नटेशः—ए, घोंगडी बिंगडी कांहीं नको. तुझ्या बायकांना सांग इकडे कोणी फिरकूं नका म्हणून. (तो सांगतो.) जवळ ये, आणखी जवळ ये. तुला एक महत्वाची कामगिरी करायची आहे. कान कर इकडे. (कुजबुजतो.)

गोम्याः—तें सारं खरं, बेत नामी आहे, पण आज तो साधणार नाहीं.

नटेशः—कां रे?

**गोट्या:**—आज सकाळीं कोणी कोकणांतला पाहुणा आला आहे. बहुतकरून रमाबाईचा माहेरचा असावा असं दिसतं. तो आज आणि उद्यांचा दिवस राहून उद्यां रात्रीं किंवा परवां सकाळीं जाणार आहे. तेव्हां मला असं वाटतं, हो साहजिकच आहे. आणखी कांहीं दिवस धनीसाबांनीं धीर धरावा. म्हण आहे, धीर सो गंभीर !

**नटेश:**—अरे, काम साधत असलें तर हवा तितका धीर धरण्यास मी तयार आहें. बरं पण नाटकरावाच्या घरची चाकरी कशी काय साधते तुला ?

**गोट्या:**—आपल्या कृपेनें मी दोघां नवराबायकोचा विश्वास संपादन केला आहे धनीसाब. आपण आणखी आठ दिवस थांबाल तर आपला डाव साधण्याची हमी मी घेतों.

**नटेश:**—म्हणजे रे ? आठ दिवसांत विशेष काय होणार आहे ?

**गोट्या:**—रमाबाईला एक सैंपाकीण बाई हवी आहे. आपण जर आपल्याला अनुकूल अशी एकादी बाई पैदा केली तर हां हां म्हणतां काम फत्ते झालेंच समजा.

**नटेश:**—समजलों. शाबास गोट्या ! हें बक्षिस तुला. ( दहा रुपयांची नोट देतो ) आपल्याजवळ बाई आहे !

**गोट्या:**—ती कोणती ?

**नटेश:**—गुलछबूची दासी, रेवडी. तिला सैंपाकीण बनविलें पाहिजे.

**गोट्या:**—हलकट बायकोच्या–रांडेच्या घरीं वागलेली ती दासी रमाबाई सारख्या पुण्यशील स्वभावाच्या बाईच्या घरीं कशी वागणार ? धनीसाब, हें मला पसंत नाहीं.

**नटेश:**—अरे, त्याची काळजी तूं करूं नकोस. तिला अनसूया अरुंधतीपेक्षांही सभ्य बायको मी करून देईन. तूं रमाबाईला सांग, म्हणावें बाई माझ्या विश्वासांतली मिळाली आहे.

**गोट्या:**—तें माझ्याकडे लागलें. आपण आपलें संभाळा. मी त्यांना सांगतों एक दोन दिवसांत बाई आणतों, आपण दुसरीकडे शोध करूं नये म्हणून.

**नटेश:**—ठीक आहे. मी रेवडीला तयार करतों. गोट्या, लक्ष्यांत ठेव. असा घाट जुळवून आणायचा कीं एकाच दिवशीं एकाच वेळेस दोन्ही पक्षी जाळ्यांत अडकले पाहिजेत. या प्रकरणांत आपल्याला फार सावधगिरी ठेविली पाहिजे. म्हणजे,

जर का गुलछबू बिथरली तर सर्वच घाट ढासळणार ! तेव्हां गुलछबूला मोठ्या युक्तीनें अनुकूल करून घेतलें पाहिजे.

**गोट्याः**—हें हो काय धनीसाब ? ती आहेच अनुकूल. नवीन कांहीं करायची नाहीं.

**नटेशः**—तूं दोन बायका करून देखील गाढवच राहिलास. आतां या कामांत फत्ते मिळाल्यावर रेवडीची धोंड तुझ्या गळ्यांत मी बांधणार आहें. तीन बायका झाल्यावर तरी तुला बायकांचं अंतरंग कळूं लागेल.

**गोट्याः**—सरकार, माझ्या प्रत्येक सांध्या सांध्यावर अशा साखरेच्या धोंडी कोणी बांधीत असलां तर मला हव्याच आहेत. हो, साहजिकच आहे. रेवडी तिसरी बायको मिळाल्यावर मी तीन बायकावाल्या दशरथासारखा शोभेन. सध्या म्हातारी गंगा आणि तरुण पार्वती या दोन बायकावाल्या शंकरासारखा मी शोभतों आहें. अहाहा ! मी शंकर आणि माझ्या समोर नंदी ? काय देखावा !

**नटेशः**—हे नाटकरावाचे धाकटे बंधू ! ( कान धरतो. ) गोट्या, माझ्या बोलण्याकडे लक्ष दे. नाहीं तर शंकराप्रमाणें एका तोंडाचीं आतांच्या आतां पांच तोंडें करून टाकीन समजलास ! गुलछबू अनुकूल करणें म्हणजे काय ?

**गोट्याः**—सरकार चुकलों. बायकांच्या सुखाची कल्पनाच अशी असते कीं माणूस वेडा होऊन जातो. हो साहजिकच आहे. सरकार माझ्या डोक्यांत कांहीं ही गोष्ट येत नाहीं. त्यांतून अर्धें डोकें म्हातारें !

**नटेशः**—अरे मूर्खा, बायका पुरुषांना भुलविण्याच्या कामीं हव्या तशा उपयोगी पडतील. पण बायकांनाच भुलविण्यांत अगदीं नाहीं कबूल व्हायच्या.

**गोट्याः**—कां तर, पुरुष कांहीं सवत होत नाहीं. हो, साहजिकच आहे. बायको तत्काल सवत होऊन तिच्या सुखांत विरजण पाडते. रमाबाई तुम्हाला सांपडल्यावर गुलछबूकडे तुमचें लक्ष कधींमधींच जाणार. हो, साहजिकच आहे. भ्रमरवृत्ति ! सरकार, हें माझ्या अर्ध्या इकडच्या तरुण डोक्यांतलें शहाणपण आतां बाहेर पडलें !

**नटेशः**—आतां तूं नीट समजलास. बरं तर, मी गुलछबूला आणि रेवडीला अनुकूल करून ठेवतों. तूं हुशारीनें पुढच्या बेताला लाग. कोणालाही यत्किंचित् सुद्धां संशय येतां कामा नये. गोट्या, या बनावट सहीच्या प्रकरणांत बसंतराव फजीत झाला कीं मी मॅनेजर, मोहनराय माझा असिस्टंट आणि गोट्या

तूं आमच्या बँकेचा हेडक्लार्क होणार हें मी अगदीं ठरवून ठेवलं आहे. नाटकरावाची रमा आणि संपत्ति त्याला प्रेमाच्याच वेडाला बळी देऊन मी हरण करणार, आणि मग तुमचें आमचें रामराज्य असेंच अव्याहत चालणार ! सुशीलेच्या रदबदलीचा परिणाम कांहीं झाला नाहीं. उलट वसंतरावानें चिडून जाऊन मला सस्पेंड केलें आहे. आतां त्यांच्या सुखाच्या संसारावर मी निखारा ठेवला नाहीं तर नांवाचा नटेशच नव्हे !

[ पडदा पडतो. ]

---

# अंक ३ रा

## प्रवेश ३ रा

[ **स्थळः**—वसंतरावांचा दिवाणखाना—विठ्या साफसुफी करीत आहे तोंच रमा येते. ]

**रमाः**—विठ्या, सुशीलाबाईंना सांग मी आलें आहें म्हणून. (विठ्या जाऊन परत येतो. )

**विठ्याः**—बाईसाहेब आंग धुतल्या आहेत. त्या म्हणाल्या, कोरडं नेसून लवकरच येतें म्हणून सांग. ( जातो.)

**रमाः**—तिकडे मला नेहमीं नीरस, गांवढळ, जंगली म्हणून हिणवायचं असतं. पण माझ्या मेलीच्या मनांत हें सारं हिणवणं आहे याचा प्रकाश आजपर्यंत पडला नव्हता. अलीकडे ती मेली गुलछबू का गूखब्बू घरांत आणली आहे. तिचं वर्तन मला मुद्दाम धडा म्हणून बघायला सांगायचं. त्या मेलीचं नाटकी वागणं नू नटणं बघून मी नीरस, जंगली कां आणि ती येवढी प्रेमळ आणि सुधारलेली कां, हें माझ्या लक्षांत आलं. साधी सरळ वागणूक म्हणजे नीरस, जंगली आणि तिचं मेलीचं मनांत एक व बाहेर एक असलं नाटकी वागणं हें झालं प्रेमळ. पण कांहीं केलं तरी मला बाई तें साधायचं नाहीं. मला एवढं ठाऊक आहे आपल्या नशिबीं जो पुरुष पति म्हणून आला आहे त्याला आपला देव समजून त्याच्याशीं निष्कपटपणें सरळ आणि शुद्ध वर्तन ठेवायचं. (सुशीला येते.) आतांशा आंग धुतलांत होय?

**सुशीलाः**—काय करूं बाई, भारी उकडायला लागलं. शिवाय सकाळपासून माझं डोकंही तापल्यासारखं झालं होतें, म्हणून म्हटलं आंगावर थोडें थंड पाणी घेऊन गारवा आणावा.

**रमा**:—आमच्यावर तुम्हा नवरा बायकोचा राग झाला आहे हें खरं का ? मला सांगायचं झालं त्या वेळीं मला भारी आश्चर्य वाटलं. मला मुळीं खरंच वाटेना ! सुशिलाबाई, असं झालं असलं तर मग आमच्यावर आकाशच फाटलं म्हणायचं ?

**सुशीला**:—कांहीं आकाश फाटत नाहीं न् कांहीं होत नाहीं ! रमाबाई, तिकडे तसं मुद्दाम करायचं झालं आहे.

**रमा**:—मी बाई अधिकच बुचकळ्यांत पडलें आहें. अलीकडच्या आमच्या परिस्थितीवरून मला असं वाटायला लागलं आहे, कीं लवकरच आम्ही मोठ्या संकटांत सांपडून आमचा सर्व नाश व्हायची वेळ जवळ आली आहे. तुम्हाला नाहीं का तसं वाटत ?

**सुशीला**:—तसं वाटतं म्हणूनच तुम्हाला या परिस्थितींतून सोडविण्यासाठीं तिकडे नाटकभाऊजींशीं अबोला धरला आहे. हा आमचा राग नसून तुमच्या हिताची खटपट आहे बरं रमाबाई ! अशा गोंधळूं नका !

**रमा**:—गोंधळूं नको तर काय करूं बाई ? आमच्याशीं अगदीं संबंध सोडायचा ! आमचा तिरस्कार करायचा आणि तोही अशा आणीबाणीच्या प्रसंगीं आमच्या मित्रांनींच ! मन गोंधळणार नाहीं तर काय होईल तुम्हीच सांगा !!

**सुशीला**:—तेंच सांगतें आहे. हें बघा, उपदेशानें आडमार्गी शिरलेला मनुष्य वळत नसला म्हणजे त्याला सामानंतरचा दंड हा उपाय योजावा लागतो; आणि त्यांतच भेदाचाही प्रयोग करावा लागतो. नाटकभाऊजींना पुष्कळ सांगून पाहिलं. तुम्हीं सांगितलं आणि रोज सांगत आहांच. तिकडेही किती किती सांगितलं पण ऐकताहेत का ? नाहीं. म्हणून आम्हीं असें योजलें आहे कीं थोडा कडू विषाचा अनुभव येऊं द्यावा आणि विषाचा परिणाम मर्यादेच्या बाहेर जाऊं लागला कीं त्याला सपशेल उतार द्यायचा. हात भाजल्याशिवाय विस्तवाला हात लावूं नये हें तत्त्व पुष्कळांना मानतच नाहीं ! नाटकभाऊजींच्या मनाला तिकडचा फार नाहीं तरी थोडाबहुत धाक वाटायचा आणि साधारण चुकांपेक्षां मोठाल्या चुका ते अर्थात् तिकडे न कळतील अशा बेतानें करणार ! शिवाय त्या मेल्या मांगाची सल्ला मसलत आहेच. त्याच्याही डोळ्यांत तिकडे अगदीं खड्यासारखे खुपताहेत. तेव्हां दोघांनाही मोकाट सोडावें म्हणजे ते होतील निर्भय आणि कोणीं आपणाला पहात नाहींत अशा समजुतीनें वागतील. त्यांचा हा भ्रम कायम ठेवून तिकडे योजून ठेवलेल्या सरकारी डिटेक्टिवानें नटेशाच्या अपराधाची चौकशी करीत

असतांना नाटकभाऊजींवर करडी नजर ठेवायची आणि त्याच्या कामाला तिकडे मदत करायची, असें ठरलें आहे; तेव्हां तुम्ही आतां अगदीं निर्घोर रहा. अशा वेळीं आम्हीं तुम्हाला सोडलें म्हणजे चांगलाच स्नेह म्हणावयाचा !

**रमाः**—माझ्या जिवावरची धोंड उतरली बाई ! मी ऐकलं तेव्हां अगदीं घाबरून गेलें बाई ! म्हणून सवड मिळतांच तुम्हाला विचारायला आलें. तिकडे मलासुद्धां ताकीद झाली आहे कीं तुमच्याकडे फिरकायचेंसुद्धां नाहीं. बरं ! आमचें हें असं योजलं आहे तुम्ही, पण तुमच्या कर्जाचं काय झालं ? त्या दिवशीं नटेश आला होताना ?

**सुशीलाः**—रमाबाई, तुमच्या स्थितीपेक्षां माझी अवस्था फारच भयंकर होत चालली आहे.

**रमाः**—तुमचें भाषण जों जों ऐकावें तों तों आपलें नवलच वाटायला लागतं. तुमची अवस्था हो काय झालं बिघडायला ? वसंतभाऊजींसारखा मायाळू नवरा, अधिकार हातीं, चांगला मोठा पगार, दोघांचेंही आरोग्य धडधाकट, असा सोन्यासारखा सारा संसार चालला आहे आणि म्हणे माझी अवस्था वाईट ! आतां एवढं बरीक व्यंग आहे साऱ्या सुखांत, कीं अजून एकादं छबकडें नाहीं दिलें देवानें ! तेंही देईल ! अजून कांहीं वयं झालीं नाहींत तुमचीं !

**सुशीलाः**—रमाबाई, मी सुखी आहें असं तुम्हाला खरंच का वाटतं ? मला कसलीं दुःखें रात्रंदिवस इंगळीसारखीं टोंचताहेत हें जर तुम्हाला कळलें तर तुम्ही पुन्हां असं कधीं म्हणणार नाहीं. माझ्यावर आज जो प्रसंग आहे तो वैऱ्यावरही येऊं नये.

**रमाः**—मग मला सांगाच तर बाई. मी तुम्हाला मोठें सुखी जोडपें समजतें. परमेश्वरानं तुम्हाला अगदीं लहानपणापासून सुखांत वाढविलें आहे. संसाराची जबाबदारी किंवा संसाराचे चटके तुम्हाला अद्याप कसे ते ठाऊक नाहींत, इतकेंच नव्हे तर तुम्ही माझ्यासारख्याच संसाराच्या कामांत पोरसवदा आहांत असंच मला आजवर वाटत होतं.

**सुशीलाः**—तुम्हालाच काय पण आमच्या ओळखीच्या साऱ्या जगाला हेंच वाटतं आहे. रमाबाई हा सारा भ्रम आहे. अल्लड मुलींना पापं करायचीं माहीत नसतात. त्या धाडसी नसतात, गुन्ह्यांना त्या पारख्या असतात. पण माझं तसं नाहीं. मी फार मोठा गुन्हा करून या हृदयांत कोंडून ठेवला आहे. माझ्या हृदयाच्या पाकळ्या तो ओठीत असतांना तें सारं दुःख सहन करून मुद्रेवर उसना

आनंद, खोटा उल्हास आणून मी माझ्या पतिदेवाशीं निबळ प्रतारणा चालविली आहे. जगाला माझा गुन्हा कळला तर तें मला कपटीच म्हणेल.

**रमाः**—पण, तुम्हीं असं केलं तरी काय आहे?

**सुशीलाः**—आज नटेशची ज्या गुन्ह्याबद्दल चौकशी चालू आहे, तोच बनावट सहीचा गुन्हा मींही केला आहे—मला करावा लागला!!

**रमाः**—बनावट सहीचा गुन्हा! अगबाई!

**सुशीलाः**—अशा घाबरूं नका. कठोर मनानें ऐका. मी नटेशरावाकडून उसने रुपये घेतले आणि त्यामुळें माझ्या हातून तिकडे प्राण बचावण्याचा उपाय झाला. पतिदेवाच्या इच्छेविरुद्ध मी कर्ज करून पतीचे प्राण वांचविले ही सामान्य गोष्ट मी समजतें—पण रमाबाई नाटकांत वर्णन केलेल्या धाडसी स्त्रीप्रमाणें किंवा पुराणांतील एखाद्या पराक्रमी स्त्रीप्रमाणें मोठ्या धाडसानें मी माझं सौभाग्य काळाच्या दाढेंतून सोडवून आणलं आहे. नटेशनं तिकडची सही आणि जामीन साक्ष म्हणून बाबांची सही मागीतली होती हें तुम्हाला ठाऊकच आहे. इकडे जवळ जवळ बेशुद्ध आणि तिकडे बाबांचीही मरणकाळची शेवटची बेशुद्धि अशा स्थितींत मी सह्या कशा घ्यायच्या? तिकडे शुद्धीवर असते तरी कर्जरोख्यावर त्यांनीं सही केलीच नसती. नटेश सह्यांखेरीज रुपये देणार नाहीं हें मला दिसतच होतें. रुपयांशिवाय मी माझ्या सौभाग्यासाठीं काळाशीं भांडणें व्यर्थ झालं असतं. शेवटीं काय होईल तें होवो, असं म्हणून मनाचा पक्का धडा केला. आणि दोघांच्याही सह्या मीच एकटीनें करून नटेशरावांजवळून रुपये घेतले. बाबा अत्यवस्थ आहेत हें नटेशाला चांगलेंसें माहीत नव्हतें. मी सह्या केल्या त्याच्या दोनतीन दिवसांपूर्वी बाबा वारले होते, आणि इथंच माझं चुकलं. मला तारीख आणि तिथी यांची भानगड सुचली नाहीं आणि ही चूक नटेशच्या पथ्यावर पडली. रमाबाई, नटेशनें मला दस्तावेज परत दिला नाहीं. माझी नोकरी कायम राहिली तरच मी बाकी घेऊन दस्तावेज परत देईन, असं तो म्हणतो आहे. मोठाले दोन अनर्थ निश्चित घडणार असले तर त्यापैकीं कमी नुकसानीचा अनर्थ होऊं द्यावा आणि आपली सर्व शक्ति जास्त अनर्थकारक संकट टाळण्यांत खर्च करावी. हें तत्व ध्यानांत घेऊन नटेशबद्दल मी तिकडे करूं नये तरी रदबदली केली. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. त्याला तिकडे सस्पेण्ड केलें आहे. नटेशला मोकळा ठेविल्यास बँकेची हानी आणि अटक केल्यास आमच्या संसारसुखाची राख

रांगोळी असे दोन अनर्थ मला डोळयांपुढें दिसत आहेत आणि ते दोन्ही मी टाळले असते. कारण नटेशची चाकरी माझ्या खटपटीनें राहिली असती तर बाकी देऊन दस्तावेज मी परत घेतला असता आणि सर्व संकटाचं मूळ म्हणून तो कागद मी नाहीसा केला असता. कागद नाहींसा झाल्यावर मला किंवा तिकडे नटेशला भिण्याचें कांहींच कारण नव्हतें; आणि मग त्याला कोर्टांत खुशाल ओढलें असतें तर आपोआप हा दुष्ट कांटा दूर झाला असता !

**रमाः**—बरं, भाऊजी बरे झाल्यानंतर त्यांनीं विचारलें असेलच कीं पैसे कोठून आले म्हणून ?

**सुशीलाः**—होय, पण मी सांगितलं कीं बाबांनीं पाठविले !

**रमाः**—मी आपली पुनः विचारतें हो रागाऊं नका ! असलं धाडस करण्यापेक्षां आमच्या जवळ पैसे कां नाहीं मागितले ?

**सुशीलाः**—त्याला दोन कारणं होतीं. एक तर तसं करण्यांत माझा स्वतःचा पराक्रम कांहींच दिसला नसता. त्या साऱ्या गोष्टी कोणालाही न कळत व्हाव्या अशी माझी इच्छा होती. आतां हें प्रकरण उद्भवलं म्हणून नटेश मला अडवितो आहे; पण हें प्रकरण उद्भवण्याच्या पूर्वींच मला पैसे देतां आले असते आणि दस्तावेज माझ्या हातांत आला असता तर माझ्याखेरीज या जगांत ही गोष्ट कोणालाही कळली नसती. आणि माझ्या देहाबरोबरच तीही गोष्ट काळाच्या अनंत प्रवाहांत वाहून गेली असती. दुसरं असं कीं, तुमच्या जवळून रुपये घेतले आहेत हें पुढें मागें कळणारच आणि तें कळल्यावर तिकडच्या पराकाष्ठेच्या मानी स्वभावाला बिलकूल खपलें नसतें. माझ्या त्या निश्चित उघड होणाऱ्या गुन्ह्याबद्दल त्यांनीं मला पूर्ण क्षमा कधीं केली नसती. मेलों तरी बेहेत्तर आहे पण कर्जाचं नांवसुद्धां घरांत कोणाला उच्चारूं द्यावयाचा नाहीं, ही तिकडची नेहमींची प्रतिज्ञा !

**रमाः**—मग तुम्ही रुपये कसे जमविले हो कर्ज फेडायला ?

**सुशीलाः**—मला तिकडे नेहमीं उधळी, उधळ भवानी म्हणून टोंचायचं असतं पण मी तें कांहीं मनांत न आणतां त्यांचा सारा पगार महिन्याचे कांठीं संपला म्हणून बिनदिक्कत सांगत असें. पण घरांत अगदीं योग्य तेवढाच खर्च करून उरलेली रक्कम नटेशरावांस कर्जाच्या फेडींत देत असें. असं करितां करितां थोडंसं कर्ज राहिलं होतें पण मेल्या नटेशनें उलट खाल्ली आणि आतां मोठा बिकट प्रसंग ओढवला आहे.

**रमाः**—मग तुम्ही हें सारं गुप्त वसंतभाऊजींजवळ सांगून त्यांची मदत कां घेत नाहीं? मला तर वाटतं त्यांचं तुमच्यावर इतकं प्रेम आहे कीं तुमच्या सुखासाठीं ते वाटेल तेवढा स्वार्थत्याग करावयाला तयार होतील. कदाचित् ते याला एकादी तोडही काढतील? किंवा तुमचं ऐकून नटेशला एकदां क्षमा करतील—कांहीं तरी करतील! मग काय सांगणार आहांत का त्यांना? खरंच गडे सांगाच. ते कांहीं खास रागावणार नाहींत. शिवाय नटेशनं तुमच्या संसाराची राखरांगोळी करण्यापेक्षां नवरा चार दिवस रागावलेला पत्करलं!

**सुशीलाः**—माझ्या तोंडून ही गोष्ट कधींही कळायची नाहीं. दुसऱ्या कोणाकडून तिकडे कळूं नये म्हणून उलट माझी धडपड चालू आहे. माझ्या साहसाचा किंवा ज्या पराक्रमानें तिकडचे प्राण वांचले त्या पराक्रमाचा उच्चार माझ्या तोंडून न होणें, तसेंच इतर कसल्याही कारणानें हें गुप्त उघड न होणें, यांतच मला खरं समाधान आणि माझ्या जिवाचें सार्थक मी समजतें आहें. त्यांना न कळतां परस्पर या भानगडीचा निकाल लागण्यांतच आम्हां दोघांचं खरं सुख आहे. रमाबाई, तुम्ही म्हणतां नटेशनं आमच्या संसाराची धूळधाण उडविण्यापेक्षां नवरा चार दिवस रागावलेला पत्करलं! पण मी म्हणत्यें हा तुमचा भ्रम आहे. आणि संसारांतील खरं सुख कशानें लाभतें हें तुम्हाला अद्याप कळलें नाहीं असं मला म्हणावंसं वाटतं. संसारांत कांहीं अपराध असे असतात कीं त्याबद्दल नवरा स्त्रीला किंवा स्त्री नवऱ्याला पूर्णपणें—अगदीं पूर्णपणें अशी क्षमा कधींही करणार नाहीं. अब्रूशीं ज्याचा संबंध आहे असले, किंवा गृहसौख्य ज्याला म्हणतात त्या एका विशिष्ट सुखाशीं ज्या गुन्ह्याचा विशेष संबंध येतो, असले गुन्हे तर परस्परांसंबंधीं विसरणें चवळ जवळ अशक्य आहे. क्वचित् प्रसंगीं स्त्रीजातीला हें शक्य आहे, परंतु पुरुषजातीला तर कधींही शक्य नाहीं. जगाच्या इतिहासांत असलीं उदाहरणें सांपडलींच तर स्त्रियांचींच सांपडतील. पुरुषांचीं नाहींच सांपडायचीं!

**रमाः**—वसंतभाऊजी तुम्हाला पूर्णपणें क्षमा कधींही करणार नाहींत, असं तुमचं म्हणणं दिसतंय?

**सुशीलाः**—हो. आणि अशा प्रसंगीं एकदां का मनांत किंचित् सुद्धां परस्परांविषयीं उदासीनता आली किंवा संशय आला कीं त्या जोडप्याला सुख स्वप्नांतसुद्धां दिसणार नाहीं हें खास समजा. त्यापुढचा सारा जन्म म्हणजे एका संशयाच्या, उदासीनपणाच्या आणि परस्परांविषयींच्या तिरस्काराच्या

पायावर उभारलेला संसारसुखाचा भाडोत्री डोलारा होय ! त्यांत अंतःक-रणाची शुद्धता, परस्पर जीवांचें ऐक्य ह्या गोष्टी कधींही दिसायच्या नाहींत.

**रमाः**—मग तुम्ही म्हणतां तसला शुद्ध मनाचा संसार या जगांत किती ठिकाणीं सांपडणं शक्य आहे असं तुम्हाला वाटतं ?

**सुशीलाः**—असलीं उदाहरणं जगांत क्वचितच किंबहुना मुळींच नाहींत असं म्हटलं तरी चालेल. परंतु त्यामुळें रमाबाई, तत्वाला बाध येत नाहीं. नवराबायकोचीं मनं एकमेकांविषयीं कलुषित राहिलीं किंवा एकाला दुसऱ्याविषयीं कमीपणा वाटून मनांत थोडा तरी तिरस्कार सदैव जागृत राहिला, तर असलीं जोडपीं आणि असला संसार हें खरें लग्नच नव्हे. जगांतील सर्व सुखाच्या निधानाची आणि सर्व दुष्कृत्यमूलक दुःखपरंपरेला आळा घालणाऱ्या ' लग्न ' या श्रेष्ठतम संस्थेचीं असलीं जोडपीं किंवा असला संसार म्हणजे निवळ विटंबना आहे. विवाहाचा हेतु हा नाहीं. **शरीरभेदामुळें भिन्न दिसणाऱ्या दोन आत्म्यांचें संसारांतील आत्यंतिक आणि सात्विक ऐक्य म्हणजेच 'लग्न' होय;** आणि एवढयासाठींच, रमाबाई, मी म्हणतें आहे कीं माझ्याविषयीं तिकडच्या किंवा तिकडच्या विषयीं माझ्या मनांत किंचित् अनादर उत्पन्न होण्यासारखं कृत्य आमच्या हातून होऊं नये. मी जो कांहीं गुन्हा केला आहे त्याला तुम्ही वाटलं तर धाडस म्हणा; पण, मी तें पाप आहे, गुन्हा आहे असें कधींही म्हणूं देणार नाहीं. ज्या कृत्याचें मूळही सात्विक हितच आहे व शेवटही सात्विक हितच आहे अशा कृत्याला पुण्य म्हटलेंच पाहिजे. त्याची पापांत गणना करायची असेल तर पापपुण्याच्या व्याख्येचा जगांत विचकाच होतो आहे असं मी म्हणेन.

**रमाः**—एकूण तुम्हीं हें खोट्या सहीचें प्रकरण आजन्म गुप्त ठेवणार तर ? भाऊजींना कधींही सांगणार नाहीं हाच तुमचा निश्चय ना ?

**सुशीलाः**—त्यांना कळूं नये अशी माझी फार फार इच्छा आहे खरी! पण माझ्या तोंडानें त्यांना सांगण्याची पाळी आलीच तर ज्या दिवशीं आजच्या माझ्या सौंदर्याचा लोप होऊन जाईल आणि त्यामुळें तिकडेही माझी किंमत त्या मानानें कमी वाटायला लागेल, त्या दिवशीं हें माझं धाडस, हा माझा पराक्रम माझ्या समाधानाची शिल्लक म्हणून मी—पण छे, भलतंच कांहीं तरी बरळतें आहें मी ! रमाबाई, त्यांचं मजवरचं प्रेम इतकं गाढ आहे कीं अशा रीतीनं मी माझं गुप्त धाडस त्यांना सांगून त्यांच्या प्रेमाची कसोटी पाहण्याची मला बुद्धि कधींही होणार नाहीं. त्यांचं

मन इतकं उदार आहे कीं त्यांच्या दृष्टीनं भासणारा असला गुन्हा ते साफ पोटांत घालतील. इतकंच नव्हे तर त्याकरितां माझ्या ऐवजीं स्वतः हवं तेवढं प्रायश्चित्त भोगायला तयार होतील. माझ्या प्रेमाखातर हवा तेवढा स्वार्थत्याग करून कसलंही संकट आपल्या शिरावर घ्यायला ते तयार होतील. पण तो परम कृपाळू भगवान् आमचा असा छळ कधींही करणार नाहीं. आजपर्यंतच्या आमच्या सुखाच्या संसारावरून मला तशी बळकट आशा आहे. आतां सांगा रमाबाई, माझी अवस्था तुमच्यापेक्षां भयंकर आहे कीं नाहीं? माझं रहस्य भयंकर आहेना?

रमाबाईः—बाई, मला क्षमा करा! तुमच्या आनंदी स्वभावावरून आणि तुमच्या वर वरच्या वागणूकीवरून तुमच्याबद्दलचा माझा अभिप्राय सपशेल चुकला आहे हें मला आतां कळलं. तुम्हीं अल्लड दिसतां तशा नाहीं. आम्हां सामान्य बायकांपेक्षां तुमच्या विचारांत आणि कृतींत कांहीं निराळें पाणी आहे हें तुमच्या हकीकतीवरून मला समजून आलें. परमेश्वर तुम्हाला सुखी करो हेंच मी त्याजवळ मागणें मागतें! तरी पण हें सारं वसंतभाऊजींना तुम्ही सांगून ठेवणं मला अजूनही बरं वाटतं. तुमचीं कारणं योग्य आहेत कीं नाहींत याबद्दल मी निश्चित मत देऊं शकत नाहीं; तसेंच तुम्ही त्यावेळीं काय करायला पाहिजे होतं आणि आज हा असा दुर्धर प्रसंग दुसऱ्यांदा ओढवल्यावर तुम्ही काय करायला हव आहे हेंही मला सांगतां येणार नाहीं. इच्छा पुष्कळ आहे पण हा विषय माझ्या सामान्य बुद्धीच्या आंवाक्याबाहेरचा आहे. लग्नाबद्दलचे तुमचे विचार ऐकून मात्र मला खरंखुरं समाधान वाटलं; आणि सद्यःस्थितीचा प्रकाश माझ्या मनांत पडला! आतां यापुढें तुम्ही काय करणार? हा अनर्थ कसा टाळणार? माझा कांहीं उपयोग होण्यासारखा असला तर अनमान अगदीं करूं नका, मला त्यांत आनंदच वाटेल.

सुशीलाः—सध्यां मला कांहीं सुचत नाहीं. उपाय सुचल्यास तुम्हाला सांगेन आणि तुमच्या मदतीनेंच तो पार पाडीन. (सुशीला मध्येंच थांबते. बाहेर चाहूल ऐकायला येते.) घरीं यायचं झालं वाटतं. (इतक्यांत वसंतराव येतो. त्या उठून उभ्या राहतात व थोड्या गोंधळतात.)

वसंतरावः—बसा, मला पुन्हां बाहेरच जायच आहे. काय ग, रमा वहिनीला सांगितलं ना सारं? रमावहिनी, तुम्ही अगदीं घाबरूं नका. आमच्यावर रागवूं नका. मानवी शक्तीच्या ताब्यांतील हर प्रयत्न करून मी नाटकरावाचा आणि तुमचा बचाव करीन. तुम्हीं थोडें आमच्या ह्या सुशीलेला सांगा कांहीं.

कारण नसतांना उगीचच नटेशाला भिते आहे. अरे, पण वाः, काय मी शाहणा! अनायासें योग आला आहे तो कां दवडा? अरे विठ्या (तो येतो.) ते पलीकडे दालनांत गृहस्थ उभे आहेतना? त्यांना आंत घेऊन ये. (तो जातो.) तुम्ही उभ्या कां, बसा कीं दोघी! (इतक्यांत मोहन डिटेक्टिवच्या वेषांत येतो. वसंतराव त्यास सन्मानानें बसवितो.) आमच्या नाटकरावांचें हें कुटुंब! आणि ही आमची घरची मंडळी! रमावहिनी, नाटकरावाच्या आणि बँकेच्या अब्रूरखवालीची जबाबदारी ज्यांनीं आपले शिरावर घेतली आहे. ते हे सरकारी डिटेक्टिव्ह खान-बहादुर मिस्टर दिलावरखां! ज्या माणसांची यांनीं काळजी करायची तीं सारीं एकदां यांच्या नजरेखालून गेलेलीं असलीं म्हणजे त्यांच्या कामास जास्त सोईचें होईल अशी त्यांनीं इच्छा दर्शविल्यावरून त्यांना आंत घेऊन आलों. अहो, कांहीं थोडासा तहानलाडू वगैरे असल्यास आणा कीं? (सुशीला व रमा जातात.)

**मोहनः**—वसंतराव, आज तुमच्या कुटुंबाला बरं नाहींसं दिसतें. आजारी बिजारी असतात का अलीकडे?

**वसंतरावः**—आजारीबिजारी कांहीं नाहीं, पण अलीकडे ती उदास मात्र बरीच असते. नटेशरावाला कामावरून काढूं नका म्हणून सारखी माझ्या मागें लागली आहे; पण अशा भलत्या बाबतींत मी तिचा हट्ट पुरविणें म्हणजे अन्यायाला मदत करून लोकांच्या बँकेसारख्या महत्वाच्या लोकोपयोगी संस्थेवरील विश्वास नाहींसा करणेंच नव्हे का? (फराळ चहा वगैरे घेऊन रमा व सुशीला येतात आणि खाणेंपिणें सुरू होतें, तों पडदा पडतो.)

---

## अंक ३ रा

### प्रवेश ४ था

[ स्थळ—नाटकरावाचें घर—नाटकराव विचार करीत बसला आहे. ]

**नाटकरावः**—लाडक्या गुलछबूला घरांत आणण्यापूर्वी वेळ कसा घालवावा हीच मोठी मला काळजी वाटत असे. आमच्या प्रेमशून्य प्रेमाबाईच्या संगतींत एक एक पळ मला युगाप्रमाणें कंटाळवाणें वाटत असे. आतां तें पारखें पार फिरून गुलछबूच्या संगतींत असं वाटायला लागलें आहे कीं, सूर्यानें दुपारीं बारा वाजतां दोन तास आकाशाच्या डोक्यावर आणि रात्रीं बारा वाजतां दोन तास

समुद्राच्या तळाशीं, अशी चार तासांची विश्रांती घेऊन सध्यां असलेलें दिनमान चार तासांनीं वाढवावें. आमची प्रेमा रूपानें कांहीं वाईट नाहीं. पण प्रेमाचा रंग तिच्या रक्तांत नसल्यानें तिचा चेहरा, तिचं बोलणं, तिचं वागणं, सारं जंगली-पणाचें मला वाटतें, यांत माझा काय दोष ? तेंच गुलछबूकडे पहावं तर तिचा प्रत्येक शब्द, प्रत्येक पाऊल आणि प्रत्येक कटाक्ष निवळ प्रेमाचाच बनलेला असतो. प्रेमा म्हणते तुम्ही माझी हेळसांड करतां. करूं नको तर काय करूं ? आमच्या समाजांत ज्या अनेक घाणी आहेत त्यांपैकींच ही एक आहे कीं, प्रेमाच्या भुकेल्या माणसांनीं घरच्या बायकोपासून प्रेमसुख मिळालें नाहीं तरी घरींच हात चोळीत बसावें. प्रेममंदिराच्या पायऱ्या आम्ही चढलों कीं या धर्मशा-स्त्र्यांचे जणूं बाप मरतात. प्रेमाची लयलूट हा प्रत्येक सुशिक्षिताचा जन्मसिद्ध हक्क आहे. गुलछबूसारखं प्रेमरत्न गवसण्यापूर्वी मला वाटत असे, वसंतराव मोठा सुखी, सुशीलावहिनी त्याला रोज प्रेमाचे घुटके पाजीत असावी. पण त्याला म्हणावं एक-दां माझा आणि गुलछबूचा प्रेमविलास पहा तरी. म्हणजे सारी घमेंड कशी खाड-कन् जिरून जाईल ! प्रेमाबाई जर प्रेमळ असती तर काय बहार झाली असती ! जाऊंद्या ! लग्नाच्या बायकोपासून जर प्रेम मिळालं नाहीं तर जी तें देईल तिला आपण जवळ करावी. लग्नाची बायको जरी जानव्याची गांठ असली तरी मला काय त्याचें ? गुलछबूनं माझ्या गळ्यांतलं तें सुताचें जानवं तोडून ज्या दिवशीं आपल्या लुसलुशीत प्रेमयुक्त भुजलतेचं जानवं घातलं, आणि ब्रह्मगांठ भिरकावून माझ्या गळ्यांत प्रेमगांठ मारली, त्याच दिवशीं ही लग्नाची जन्मगांठ मी तोडून टाकिली ! बाकी कधीं कधीं मला असंही वाटतें कीं आमच्या प्रेमाबाईला कृत्रिम उपायांनीं प्रेमळ बनविली तर मग मी ऋद्धिसिद्धिवाल्या गजाननासारखा प्रेम-सुखी होईन. आज नटेशराव आले म्हणजे असले कांहीं कृत्रिम उपाय असल्यास त्यांना विचारीन. आमची प्रेमा मला नीतीच्या गोष्टी फार सांगते आणि मला असंही वाटतं कीं ती मूळची मोठी प्रेमळ असावी; पण नीतीच्या व धर्मशास्त्राच्या थोतांडांनीं तिचं मन बहकलं असावं. असं जर झालं असलं तर तिच्या मनां-तून नीति आणि धर्म हे नाहींसे केले पाहिजेत. हे नाहींसे केले कीं या थोतांडाच्या राखेखालीं दडपला गेलेला तिच्या मनांतील मजविषयींचा प्रेमाचा लाल निखारा आपल्या तेजानें झळकायला लागेल. नीति आणि धर्म यांचा कायमचा विसर पाडणारें औषध—( विचार करतो तोंच नटेश आणि मोहन दोन बाजूंनीं प्रवेश करतात. )

**नटेशराव:**—ही बाटली !

**मोहन:**—आणि हा प्याला !

**नटेशराव:**—नाटकराव, अरे औषध तुझ्या टेबलावर ठेवलेलें असतांना कस्तुरीहरणासारखं रे काय करतोस ?

**मोहन:**—तुम्ही नेहमीं प्रेमचिंतनांत निमग्न असतांना तुमच्या मेंदूस नीतीच्या आणि धर्मांच्या पिशाच्चाचं वारं कशानं शिवलं हो ? हें पहा, मी तुम्हाला सांगून ठेवतों कीं जेव्हां जेव्हां हे भिकारडे विचार तुमच्या मनांत डोकावतील, तेव्हां तेव्हां ही बाटली आणि हा प्याला त्यांच्या कपाळांत घालीत चला. अहो दारूचा अंमल मेंदूवर चढला कीं नीतीचा अंमल पार उतरलाच समजा ! हो, अगदीं शंका नको ! आज नटेशरावांच्या हुकुमावरून ही एक नवीन लज्जत तुमच्यासाठीं आणली आहे. या लज्जतीचा स्वाद घ्या आणि चमत्कार पहा. नीतीची धूळधाण करणारं हें एक उत्तम रसायन आहे.

**नाटकराव:**—म्हणजे या रसायनापेक्षां या नव्या लज्जतींत विशेष काय आहे ?

**नटेशराव:**—मोहन, त्यांना एक ग्लास दे आणि अनभवूं दे चमत्कार एकदा. ( तो भरूं लागतो ) नाटकराव, या रसायनाचा एकच घोंट घेतल्यानंतर बरोबर पांच मिनिटांनीं माणसाच्या मनांतल्या नीतीच्या वल्गना पार नाहींशा होऊन त्यांच्या जागीं प्रेमाला अनुकूल असे सद्विचार तोंडानें बाहेर पडायला लागतात. घेतोस अनुभव ? बघ तर, आतां आपण या मोहनवरच त्याचा प्रयोग करूं. मोहनराय, तो ग्लास तोंडाला लावून खलास कर ! शाबास !

**नाटकराव:**—नटेशराव, मोहनरायांवर काय परिणाम होतो आहे तें बघूंच, पण मला असं वाटतं आपल्या गोव्यावरही हा प्रयोग करावा. या दोघांवरही जर एकच परिणाम दिसला तर या औषधाबद्दल माझी खात्री होईल.

**नटेशराव:**—ठीक आहे. तुमच्या इच्छेप्रमाणें होऊंद्या. अहो दोघेच काय, सारा गांव जरी आणला तरी या औषधानें त्याला प्रेमाचें वेड लागून तें पिसाळलं नाहीं तर बोलतों आहें कशाला ? बोलवा तुमच्या गोव्याला !

**नाटकराव:**—( कॉल बेल वाजवितो व गोव्या येतो. ) गोव्या, असा समोर उभा रहा. मोहनराय तुम्ही एक घोट आणखीं घ्या आणि एक ग्लास या गोव्याला पाजा ( वे तसें करतात. )

नटेशरावः—आतां तुम्ही डोळे मिटून बसा. गोट्या, तूंही तसा बैस. नाटकराव, पांच मिनिटांनीं या औषधाचा प्रभाव तुम्हाला दिसायला लागेल. हें औषध मी मोठ्या प्रयासानें मिळविलें आहे.

नाटकरावः—नटेश, मागें तुम्ही म्हणत होतां तसला प्रेमरोग यांना जडेल काय ?

नटेशरावः—नाहीं, प्रेमरोग जडणार नाहीं. पण तसल्या भावना मात्र कांहीं वेळपर्यंत खास होतील.

नाटकरावः—असलं एकादं औषध आहे का रे कीं, ज्यामुळं जी स्त्री अगदीं प्रेमशून्य असेल तिला तें पाजल्याबरोबर ती ताबडतोब प्रेमळ होईल ? मागें तूं म्हणत होतास प्रेमरोगाचं एक इंजेक्शन निघालें आहे. तसं प्रेमरोग जडविण्याचं आणि प्रेमरोग जडल्यानंतर रोग तेवढा कमी होऊन प्रेम मात्र सारखं वाढत जाईल असलं एकादं इंजेक्शन नाहीं का ? मी एक प्रयोग करून पाहणार आहें.

नटेशरावः—अरे, तुला हवं तसलंच हें एक औषध आहे. बरं तें मी तुला मागाहून समजावीन. तो बघितलास का मोहन चळवळ करूं लागला आणि गोट्या सुस्कारे सोडूं लागला. आतां नीट लक्ष दे ! हा मोहनराव उच्च कुलांतला एक गुजराथी असल्यानें त्याच्या तोंडीं प्रेमी कुलीनास शोभतील असेच उद्गार, अशीच भाषा, विचार, कल्पना वगैरे सर्व एकाद्या कवीप्रमाणें तुला ऐकायला मिळेल. पण गोट्या हा मात्र एक हलक्या दर्जाचा गडी असल्यानें त्याच्या औकातीप्रमाणेंच तो आपले विचार तुला सांगेल. ( मोहनराय सुस्कारा सोडून प्रेमसमाधींत उठून उभा राहतो. )

मोहनः—प्रिय मित्र नाटकराव, परमेश्वराच्या हातानं अत्यंत श्रेष्ठ अशी कोणती वस्तु पैदा झाली आहे असं तुम्हाला वाटतं ? सर्व सृष्टीचं प्रदर्शन आपल्या डोळ्यांपुढें आणा आणि मला सांगा !

नाटकरावः—मानवी प्राण्याच्या मेंदूंतील बुद्धिसामर्थ्य ही सर्वांत अजब आणि श्रेष्ठ अशी परमेश्वरी कारागिरी आहे !

मोहनः—नाटकराव, अगदीं घसरलांत ! अहो, मेंदू हा ज्या वस्तूचा एक अंगविभाग आहे, अशी स्त्रीजात हीच एक अद्भुत रम्य आणि श्रेष्ठ अशी परमेश्वरी कृति आहे. मी उगीच बोलतों असं तुम्ही समजूं नका. ही वस्तु इतकी मोहक आहे कीं, प्रत्यक्ष परमेश्वरालाही तिचा मोह आवरला गेला नाहीं. पुराणांत असा दाखला आहे ! परमेश्वरानें सर्व चराचर जग उत्पन्न केल्यावर स्वतःच्या कारागिरीचं चीज

करणारा कोणी तरी प्राणी उत्पन्न करावा अशी त्याला इच्छा उत्पन्न झाली आणि लगेच त्यानें मनुष्य प्राणी घडविला. परंतु त्या प्राण्याकडे एकदाच पाहिल्यावर परमेश्वराला असं वाटायला लागलं कीं, या प्राण्याची इतर चराचर जगाशीं तुलना करतांना मनुष्यप्राणी ही माझी सर्वांत सरस कृति वाटते. तेव्हां हा प्राणी 'मी सर्वश्रेष्ठ आहें' अशी घमेंड करून माझ्या कौशल्याचं चीज करण्याऐवजीं इतर सृष्टीकडे तुच्छतेनेंच नाक मुरडील. ही शंका परमेश्वराच्या मनांत आल्याबरोबर मानवी प्राणी घडविण्यासाठीं जें साहित्य उरलें होतें, त्यांतच आपल्या सर्व सामर्थ्यांची आणि कौशल्याची मनोमय मूस ओतून त्यानें स्त्रीजात निर्माण केली. मनुष्यप्राण्याला मोह घालून आपली स्तुति करण्यास लावणारी अशी ही स्त्रीजात परमेश्वरानें निर्माण केली; पण त्या मनुष्याला मोह पडण्यापूर्वीच त्या स्त्रीनें परमेश्वरावर मोहनी घातली. परमेश्वरानें पहिली स्त्री सरस्वति नांवाची उत्पन्न करून तिला बसण्यासाठीं सुंदर रत्नमय पिसाऱ्याचा मोर आणि करमणुकीसाठीं कर्णमधुर अशी वीणा हातांत दिली. नाटकराव, स्त्रीजातींतील त्या पहिल्या रत्नाची घडण पाहून परमेश्वर आत्मभान विसरून गेला आणि आपण हें काय करतों याचा विचार न करतां प्रत्यक्ष आपल्या कन्येचा त्यानें नीच अभिलाष धरला असं पुराणांत लिहिलं आहे. नाटकराव, प्रत्यक्ष परमेश्वरालाही ज्या स्त्रीजातीनें भुरळ घातली, ती स्त्री सर्वश्रेष्ठ आणि सर्वांत अजब अशी परमेश्वरी कृति नाहीं का? बोला नटेशराव, स्त्री ही काय वस्तु आहे असं तुम्हाला वाटतं?

**नटेशः**—तुम्ही दोघे उल्लू कांहीं म्हणा, पण मला बोवा असं सरळ वाटतं कीं थोड्याशा रचनाभेदानें मानवी प्राण्याचे जे दोन विभाग पडले आहेत त्यांपैकीं स्त्री हा एक आहे.

**नाटकरावः**—मोहनराय, तुमचे स्त्रीविषयक विचार ऐकून मला वाटायला लागलं आहे कीं परमेश्वराच्या गुणाचं चीज तुम्ही योग्य करतां आहांत. तुम्ही खरोखर धन्य आहां. नटेश हा मला अगदीं प्रेमशून्य रांकट विद्वान दिसतो. एरव्हीं नयनमनोहर या स्त्रीजातीबद्दल तो इतका अनादर दाखविता ना!

**मोहनः**—तुमचा शेरा बरोबर आहे. नटेशरावाची दृष्टि संकुचित आहे. नटेशराव, एकादी रमणी आपल्या डोळ्यांपुढें आणा. तुम्हाला काय दिसेल? अहो, स्त्री हें मोठें पदार्थसंग्रहालय आहे अशी तुमची खात्री होईल. आधिभौतिकशास्त्राच्या भाषेंत तिला पदार्थसंग्रहालय म्हणतां येईल आणि वेदां-

ताच्या भाषेंत अनंतकोटिब्रम्हांडाचें साक्षात् सगुण विराट स्वरूप आहे असं खुशाल म्हणावं ! अर्जुनाप्रमाणें हें विराटस्वरूप पाहून कोणीही भिणार नाहीं. कारण तें सगुण आणि नयनमनोहर आहे. या विराटस्वरूपांत दिसणार नाहीं अशी वस्तु नाहीं. गीतेचा कोरडा उपदेश ठसण्यासाठीं कृष्णानें अर्जुनाला जो विश्वरूपाचा फार्स दाखवून भेवडावून टाकलें, त्याऐवजीं त्याला एवढेंच सांगायला हवें होतें कीं एकदां परत इंद्रप्रस्थास जा आणि त्या द्रौपदीकडे—त्या विराटस्वरूपाच्या नितांत रमणीय अशा सगुण रूपाकडे–क्षणभर पहा. कृष्णाच्या हजार बातांनीं जें काम झालें नाहीं, तें द्रौपदीकडे अर्जुनानें एकदा पाहून पूर्वीच झालेलें होतें. सारांश स्त्री हें परब्रह्माचें सगुण विराटस्वरूप आहे—सर्व सृष्टीचें सर्व शास्त्रात्मक पदार्थसंग्रहालय आहें. या सगुण विराटस्वरूपांत शास्त्रें आहेत, उपनिषदें आहेत, फार काय सांगूं, इतिहास आहे, भूगोल आहे, अंकगणित आहे, भूमिती आहे.

**नटेशराव**:—काय ? इतिहास, भूगोल, अंकगणित ह्याही गोष्टी आहेत ? त्या कशा बोवा ? हें तर तुम्ही आतां भलतंच बरळूं लागलां असं मला वाटायला लागलं आहे. नटेशराव, या औषधाच्या दोन घोटांचा प्रयोग इतका अजब आहे काय कीं सर्व बायकामयं जगत् व्हावें ?

**मोहन**:—व्हायला कशाला हवें आहे ? आहेच तें ! अहो पुराव्याशिवाय बोलणारा प्रेमी नाहीं मी ! ऐका ! तुम्हांला आश्चर्य कसलं एवढं वाटतं आहे ? हो—हो भूगोलशास्त्र, खगोलशास्त्र, सुद्धां आहे ! कुठल्याही रमणीरत्नाकडे एकदां नखशिखांत पहा. आखातें, भूशीरें, उपसागर, सरोवरें, ज्वालामुखी, संयोगीभूमी, सामुद्रधुनी काय काय हवं तुम्हाला ? कपाळाच्या गौरवर्ण उदयाचलावर उगवलेला कुंकुमतिलकाचा बालरवी, भुंवयांचे इन्द्रधनुष्याखालीं डोळ्यांचीं मानस आणि पंपासरोवरें, वातावरणाच्या समुद्रांत सरळ वळणानें गेलेलें नांकाचें बांकद्वार भुशीर, नाकपुड्यांचे खंडाळा आणि कसारा नांवाचे बोगदे, हृदयांतील प्रेमसागराकडून येणाऱ्या जाणाऱ्या प्रेमसंदेशांची वाहतुक करणारा तोंडांतील अंडरग्राउंडरेलवेचा रस्ता, त्या रस्त्यावरील प्रेमसंदेशांना सुरक्षित बाहेर सोडणारी जिभेची ट्रॉली, ओंठांचे पोंवळी खडक, हनुवटीचें इगतपुरीवरचें पठार आणि त्याखालीं खोल दिसणारें उरःप्रदेशांचें नयनरम्य कोंकण ! असेच आणखी पुढें गेलांत कीं पूर्व घाट, पश्चिम घाट या दोन पर्वतांचीं दोन शिखरें ! पुनः वर चला ! डोळ्यांच्या सरोवरांतून निघून गालांच्या उपसागराला कधीं कधीं

येऊन मिळण्याऱ्या अशा प्रेमळ गंगा यमुना! नाटकराव, किती सांगूं? विराट स्वरूपाचें समग्र वर्णन कोण करूं शकणार? येथें 'नेति नेति' म्हणूनच स्वस्थ चिंतन करणें योग्य आहे. असाच इतिहास सांगतां येईल; अंकगणित, भूमिती, खगोलशास्त्र, रसायनशास्त्र सर्व कांहीं या सगुण विश्वरूपांत एकवटलं आहे! अहाहा, हे विश्वरूपिणी आदिमाये, तुझ्या प्रेममय स्वरूपाला मी अत्यंत प्रेमानें नमस्कार करतों! (ध्यानमग्न होतो. गुलछबू येऊन तो चमत्कार पहाते.)

**गुलछबू:**—प्रेमरस पाजला आहे वाटतं यांना? अगबाई, पण हें काय? हा मेला गोब्या तर बेशुद्धच दिसतोच आहे? जास्त प्यायला वाटतं अधाशी मेला? हो, दिसतंच आहे लक्षण! (नाटकरावांकडे बघून 'अगबाई' म्हणून मोठ्या नखऱ्यानें मुरका मारते. नाटकराव एकदम उठून तिला जवळ बसवितो.)

**नाटकराव:**—प्रिय मित्र नटेशराव, तुम्हां तिघांना नव्हे गोब्यासुद्धां चौघांनां कसली उपमा द्यावी हेंच मला समजत नाहीं. तुमच्या चौकडीकडे बघितलं म्हणजे तूं मदन, ही मोहिनी, हा मोहनराय वसंतऋतु आणि हा गोब्या म्हणजे प्रेमाचा सुगंध पसरविणारा मदन वायूच आहे असं वाटायला लागतं! कां असंच ना?

**गुलछबू:**—अगबाई, नटेशराव मदन, मी मेली मोहिनी, मोहनराय वसंत आणि मग इकडे नको का कांहीं उपमा? इकडे भस्मासूरच शोभायचं नाहीं का? (हंसते.) पण इश्शबाई, भस्मासुरही नाहीं आणि विश्वामित्रही नाहीं! एक मेला राक्षस आणि दुसरा थेरडा!

**नटेशराव:**—अग, मी सांगतों! आपण यांना शृंगऋषि म्हणूं या! मनाचा सरळपणा, भोळेपणा वगैरे त्या ऋषिकुमाराचे सारे गुण यांच्याशीं जुळतात. काय नाटकराव, प्रेमसमाधी लागली वाटतं?

**नाटकराव:**—माझ्या जिवींच्या जिवलगांनों, तुम्ही मला लाभल्यापासून रोज प्रेमरस, प्रेमगीत, प्रेमरसायन, प्रेमलीला वगैरे सर्व प्रेममय वस्तूंची, लयलूट मी सारखी करीत आहें. प्रेमनिराशा झालेल्या प्रेमी हतभाग्याला समाधानाच्या जागा दोन; एक गुलछबू आणि तुझ्या सारख्या मित्रांचा सहवास आणि दुसरी निशा! परमेश्वरा, या दोन्ही वस्तु मला अखंड लाभूं दे! (गुलछबू दारू पाजते.)

**नटेशराव:**—अरे या दोन वस्तु नव्हत! एक मित्रांचा सहवास म्हटलास कीं सारं आलं त्यांत! हें बघ 'मित्रं प्रीतिरसायनं नयनयोरानंदनं चेतसः' असें प्रेमसंहितेंतील सुभाषित आहे. दारू आणि मित्र दिसण्यांत दोन, पण मुळांत

एकच आहेत. मित्र हें प्रीतीचें रसायन आहे, नेत्रांचा आनंद, हतभाग्याचें समाधान आहे. मित्रा नाटकरावा, प्रत्येक पदार्थाला रसायनशास्त्रांत तीन अवस्था सांगितल्या आहेत. सॉलिड, लिक्विड, आणि गॅस. हा नियम या बाटलीला आणि तुला मला सारखाच लागू पडतो. मूळ पदार्थ प्रेम आहे. कलीजाची मित्रमंडळी ही त्या प्रेमाची सॉलिड कंडिशन आहे, ही मदिरा म्हणजे प्रेमाची साक्षात् लिक्विड कंडिशन म्हटलेली आहे आणि 'प्रेम प्रेम' म्हणून जें कांहीं आपण अनुभवतों पण पाहूं शकत नाहीं, त्या प्रेमाच्या स्वरूपाला प्रेमाची गॅस कंडिशन म्हणतात! आतां आलं ना लक्षांत?

**नाटकरावः**—(ग्लास भरून) माझे परम प्राण प्रेमळ मित्र प्रेमडॉक्टर नटेश ऊर्फ प्रेमाजीराव प्रणयराव प्रीतीवाले आणि माझ्या हृदयमंदिरांतील प्रेमदेवते गुलछबू आणि प्रेमरसाच्या समाधींत पडलेले मोहनराय, गोठ्याजीराव दोनबायके तुम्हांसारख्या प्रेमी चौकडीचा लाभ तुम्हीं मला दिलात, याबद्दल मी मोठ्या प्रेमानें तुमचें आरोग्यचिंतन करतों ( दारू पितात ). नटेश, या दोघांची प्रेमसमाधी उतरणार केव्हां? याला कांहीं उतार नाहीं का? प्रेमरस जरा जास्त झाला नाहीं का?

**नटेशरावः**—अरे, उतार सर्व गोष्टींना आहे. लहान मोठ्या सर्व पापांना जसें धर्मशास्त्रांत प्रायश्चित्त आहे, सर्व अनिष्टांना ज्योतिषांत जशीं दानें आहेत, तसा प्रेमरसालाही उतार आहे. पण यांना त्याची जरूर नाहीं. हे प्रेमरस पिणारे नेहमींचे संवयीचे असल्यानें असेंच त्यांना थोडा वेळ येथें पडूं दिल्यानें आपोआप सावध होतील. तोंवर आपण दोघे गुलछबूच्या प्रेमविलास महालांत जाऊन थोडा फलाहार करूं!

**गुलछबूः**—खरंच गडे, मी बोलवावयालाच आलें होतें, पण हा प्रेमरसाचा प्रभाव पाहण्यांत सारं विसरलें. मी सांगायला आलें होतें नागपूरची संत्रीं, काबुलचीं द्राक्षं, काशीची बर्फी वगैरे फळांचीं पार्सल आणविलीं होतीं तीं नुकतींच आलीं. चला गडे, ताजीं आहेत तोंवर चाखूं या! ( जातात. गोठ्या व मोहन उठतात. )

**मोहनः**—( टाळी देऊन ) गोठ्या, काय, उल्लू बनविला आहे कीं नाहीं?

**गोठ्याः**—अगदीं सोळा आणे!

---

## अंक ४ था

—:०:—

### प्रवेश १ ला

[ मोहन आणि गुलछबू बसले आहेत. ]

**मोहनः**—नाटकरावांस प्रेमाचें वेड तर कल्पनेबाहेर तूं लावून ठेवलेंस यांत बिलकुल शंका नाहीं. दारूही तो मनस्वी पिऊं लागला आहे. पण इतकंही करून, आपणांस तादृश फायदा कोणता झाला ? तूं मात्र आपल्या पानावर यथेच्छ तूप ओढून घेतलंस. गुलछबू, असा आपलपोटेपणा फार दिवस चालणार नाहीं बरं ?

**गुलछबूः**—मोहनराय, असं हो तुम्ही कां बोलतां मला ? नटेशरावांच्या म्हणण्याबाहेर मी काडीइतकीही जात नाहीं. अगदीं त्यांनीं मला शिकविलं तसं मीं केलं आणि अजूनही करीत आहें. मला जें काय मिळतं सवरतं तें सारं मी त्यांच्याच जवळ देत असतें, आणि तुम्ही म्हणतां हा सारा आपलपोटेपणा आहे म्हणून ? याला काय म्हणावं बाई !

**मोहनरायः**—जाऊं द्या तें ! आम्ही सध्या या भानगडीचा मुळीं विचारच करीत नाहीं.

**गुलछबूः**—सध्या करीत नाहीं म्हणजे पुढें मागें करणार आहांत वाटतं ? तुमच्या मनांत काय आलं आहे ?

**मोहनरायः**—माझ्या मनांत काय यायचं आहे तें तुझं मन तुला सांगतंच आहे. गोदे, तूं आणि मी एकांतांत असतांना यापुढें तूं मला मोहनराय म्हणूं नयेस आणि मी तुला गुलछबू म्हणणार नाहीं. मला असं वाटायला लागलं आहे कीं, आपल्या जुन्या नांवांनीं–खऱ्या नांवांनींच–एकमेकांना आपण हांक मारावी.

**गुलछबूः**—त्यांत विशेष काय आहे बाई ?

**मोहनरायः**—त्यांत पुष्कळ विशेष आहे ! आमचीं जुनीं नावं आमच्या कानीं पडलीं म्हणजे आम्ही थोडेतरी शुद्धीवर येतों. पूर्वीचीं नांव आमच्या कुलीन-पणाची साक्ष देतात आणि सध्यांचीं नांवं आमच्या दुर्वर्तनाची साक्ष देत आहेत. तेव्हां म्हणतों कीं तुम्ही आम्ही एकांतांत असतां तूं मला माझ्या ' माधव ' याच नांवानें हांक मारावी आणि मी तुला 'गोदुताई' म्हणून हांक मारणार–समजलीस ?

**गुलछबूः**—अरे, पण हें सारं नटेशरावांना आवडेल का ? त्यांनीं आपलीं नांवं बदलून टाकलीं तीं पुनः पहिलीं कायम राखण्यासाठीं नाहीं. शिवाय त्यांच्या

मर्जीविरुद्ध वागणं म्हणजे काय असतं हें तुझ्या माझ्या अनुभवाला पूर्वी दोन चार वेळां येऊन चुकलं आहे हें तूं विसरलास वाटतं ?

**मोहनराय:**—गोदूताई, तें मी विसरलों नाहीं आणि कधीं विसरणार नाहीं. तें मी विसरूं नये म्हणूनच आमच्या जुन्या नांवांनीं आपण एकमेकांस हांक मारूं या. ताई, सध्याच्या स्थितींत तुला सुख वाटतं आहे का ?

**गुलछबू:**—माधवा, तू असं कां विचारावं बरं ? मला तर वाटतं मी सध्या फार सुखांत आहें ?

**मोहनराय:**—ताई, तुझं मन तुला निराळं सांगत असतांना तूं मुद्दाम तें फिरवून सांगत आहेस. ताई, सर्व जगाला फसवितां येईल, पण स्वतःला म्हणजे स्वतःच्या मनाला कधींही फसवितां येणार नाहीं. तूं खोटं बोलते आहेस !

**गुलछबू:**—माधवा, आतां खरं कीं खोटं घेऊन काय करायचं आहे मला ? झालं तें गेलं ! आडमार्गांत प्रथम पाऊल टाकते वेळीं प्रत्येक हतभागी तरुणीस वाटत असतं कीं हा मार्ग मोठा सुखाचा आहे. पण एकदां का त्या मार्गांत शिरलं कीं सर्व मनू पालटतो. माधवा, मला सुख नसलं तरी तें आतां मानून घेण्यापलीकडे तुला मला दुसरा उपाय उरला आहे का ? आपला जन्म असाच जायचा ! माधवा, हे विचार टाकून दे. नटेशचा पराक्रम तुला चांगला ठाऊक आहे. आपल्या या भाषणांतला एक शब्द त्यानें ऐकला पुरे, कीं आपले हाल मग कुत्रासुद्धां खाणार नाहीं. तेव्हां म्हणतें आतां पुरे कर ! नटेशराव लवकरच येणार आहेत ! त्यांच्या मनांत आज कसला तरी भयंकर विचार आला आहे आणि त्या विचाराच्या सिद्धतेसाठींच त्यांनीं आपणांस येथें जमण्याची आज्ञा केली आहे. नटेशरावांची कामगिरी बजावणं यांतच तुझं माझं दोघांचं सुख समजावयाचं आहे !

**मोहनराय:**—ताई, माझ्या मनांतही आज एक भयंकर विचार आला आहे. नटेशराव येथें येऊन गेल्यानंतर तुला सांगणार आहे, आणि...............

[ गुलला गोट्या येतांना दिसतो. ती मोहनला गप्प बसण्याची खूण करते. ]

**गुलछबू:**—मोहनराय, गोट्याजीराव आलेच पहा. ( गोट्या येतो. ) नटेशराव निघालेच असतील एव्हांना ?

**गोट्या:**—घरनं निघाले आहेत. ते पोष्टांत कांहीं कामासाठीं शिरले आणि मला पुढें जा सांगितलें म्हणून मी हा असा पुढें आलों. हो, साहजिकच आहे.

बाकी मोहनराय आज जरा सांभाळूनच घ्यायचं आहे बरं का ? स्वारी अतोनात संतापलेली दिसते आहे. कां तें तुम्हाला ठाऊकच आहे. हो, साहजिकच आहे !

**मोहनराय:**—सस्पेंडीचा हुकुम हातीं पडल्यापासून ते आहेतच थोडेसे गरम ! पण गोव्याजीराव, आज ते अतोनात संतापल्यासारखे दिसायला नवं काय झालं ? कांहीं नवल विशेष घडलं आहे का ?

**गोट्या:**—नवल आणि विशेष कांहीं घडलं असेलसें मला दिसत नाहीं, परंतु आज त्यांच्याशीं बोलतांना मला भीति वाटत होती हें मात्र खरं ! हो साहजिकच आहे. आज मला असं वाटतं तुम्ही आणि मी, त्यांच्या प्रत्येक म्हणण्याला 'हो' करीत सुटायचं. हो, साहजिकच आहे आणि कमी जास्ती म्हणायसवरायचं काम या गुलछबूबाईकडे सोपवावें. हो, साहजिकच आहे.

**गुलछबू:**—कां रे ? मला कां म्हणून बळी ? तुम्ही बोला, मीही बोलेन !

**गोट्या:**—हें पहा, मोहनराय आणि तुम्ही वाटलं तर बोला, बाकी माझी कांहीं आज हिंमत होत नाहीं त्यांना अमूक योग्य आणि तमूक अयोग्य म्हणून सांगायला ! हो साहाजिकच आहे. ते सांगतील त्याला मी आपला 'हो' म्हणणार ! खरं म्हटलं तर, मोहनराय शहाणे असले तर त्यांनीं आपली आळीमिळी करावी हा उत्तम मार्ग ! गुलछबूबाई, तुमची गोष्ट आमच्याहून निराळी आहे. हो, साहजिकच आहे. आजच्यासारख्या त्यांच्या क्रोधाविष्ट स्थितींत सुद्धां त्यांना दोन गोष्टी हो ना करण्याचें सामर्थ्य फक्त तुम्हालाच आहे. कारण असं—हो, साहजिकच आहे—ते म्हणत असतात नेहमीं मी कितीही रागांत असलों तरी गुलछबूच्या चेहऱ्याकडे, हो, साहजिकच आहे, माझी नजर गेली कीं रागानें बोलवतच नाहीं. हो, साहजिकच आहे. म्हणून म्हणतों, कमीजास्त काय तें तुमचें तुम्ही बोला. तुमच्यावर कांहीं ते कधींसुद्धां रागावणार नाहींत. हो, साहजिकच आहे ! पण ते आलेच ! ( नटेश संतापलेला प्रवेश करतो. सगळे उठून उभे राहतात. नटेश बसून पत्रें चाळतो. )

**नटेशराव:**—( तिरसटपणानें ) तुम्ही असे उभे कां ? गुलछबू, ये अशी बैस इथं. ( सगळे बसतात. ) मोहनराय, गोव्या, वसंतरावानें डायरेक्टरांकडे माझ्या चहाड्या लिहून सस्पेंडीचा हुकूम आणविला आहे. ह्या सस्पेंडीच्या हुकुमानें माझी भयंकर बेअब्रू झालेली आहे आणि या सर्व अनर्थाला कारण ती सुशीला आहे. नटेशची बेअब्रू करून या जोडप्यानें आपल्या मूर्खपणानें उद्यांचें मरण

आजवर आणून ठेवलं आहे! या जोडप्याच्या नाशाचा सुरंग मी कधींचा भरून ठेवला आहे आणि बत्ती द्यायची वेळ आतां आली आहे. ती मी यथाप्रसंग लावीनच, तोंवर या नाटकरावाचा निकाल मला लावला पाहिजे. गोट्या, तुमच्या नव्या सैंपाकिणीची काय बातमी आहे?

**गोट्याः**—सरकार, आपल्या रेवडीबाईनीं शिकस्त केली, पण रमाबाई तिला वळेलसं चिन्ह दिसत नाहीं. हो, साहजिकच आहे. काल रमाबाईनीं तिला माझ्याशीं कुजबुज करतांना पाहिलं मात्र आणि त्या ज्या कांहीं संतापल्या आहेत तिच्यावर! हो, साहजिकच आहे. पुनः असं कांहीं दिसलं कीं काढून लावीन म्हणून तिला त्यांनीं धमकी दिली आहे. त्यांना आमचा कांहीं तरी संशय आला असं दिसतं. हो, साहजिकच आहे!

**नटेशरावः**—तें मला वाटलंच होतं. तूं आणि ती रेवडी दोघेंही गाढव आहांत. मूर्खा, रमा घरांत वावरत असतांना तुला आपलें प्रेम पाघळायची लहर आली? कांहीं काळ वेळ गाढवाला कळत नाहीं अगदीं! मी म्हणत असतों नेहमीं तें कांहीं खोटं नाहीं कीं तुम्ही निवळ ओझीं वाहणारे गाढव बैल आहांत म्हणून! दोन बायका करूनसुद्धां तुला अक्कल आली नाहीं! अक्कलहुषारीचीं कामें तुमच्यावर सोंपविलीं कीं घातलाच त्यांत गोंधळ तुम्ही! बरं मोहनराय, तुझं काम आतां दिरंगाईवर पडणं बरोबर नाहीं. तुला त्या दिलावरखांचा निकाल लावण्यास सांगितलं होतं त्याचं कसं काय केलं?

**मोहनरायः**—आपण त्याची काळजी करूं नये. त्याचा मीं उत्तम बंदोबस्त केला आहे.

**गुलछबूः**—म्हणजे मोहनराय, तुम्ही बाई त्याचं कांहीं बरं वाईट केलं कीं काय? नटेशराव, गडे आतां मारामारी फारशी करीत जाऊं नका. मला बाई भीति वाटते! आणखी उगीच आपला माणसांचा प्राण घेणें म्हणजे तुम्हाला कांहींच वाटत नाहीं! एकादे दिवशीं मेलं गळीं यायचं सारं आणि मग तो तुरुंग—नको ग बाई ती कल्पनाच नको! (शहारे दाखविते.)

**मोहनरायः**—गुलछबूबाई, तुम्ही फारच उतावळ्या आहांत. सगळं ऐकून तर घ्यायचं होतं आणि मग द्यायचं होतं आपलं मत! तुम्हाला विचारल्याखेरीज तर आम्ही कांहीं करीत नाहींना?

**नटेशरावः**—मोहन, तूं तिच्याशीं उगाच भांडूं नकोस. मी तिला सारं सांगतों. गुलछबू, आम्ही आतां मारामारी बिलकुल करीत नसून सर्व डाव बुद्धीच्या जोरावर

ह्मणून पाडायचा असा आमचा बेत आहे. वसंतरावानें मला सस्पेंड केलें आहे, म्हणजे माझ्या अब्रूस त्यानें उघड उघड आग लावली आहे. याबद्दल त्याला मी पूर्ण प्रायश्चित्त देईन. हें बघ, सुशीलेनें मजपासून कर्ज काढल्या वेळेपासून आजपर्यंतची सर्व हकीकत मीं यांत सविस्तर लिहून ठेविली आहे. लवकरच तिच्या घरीं ज्येष्ठागौरीच्या हळद कुंकवाचा मोठा समारंभ होणार आहे आणि त्या दिवशीं तें सुखी जोडपें अत्यंत आनंदांत असेल. कारण त्यांना वाटत आहे कीं या सरकारी डिटेक्टिव्हच्या मदतीनें माझे गुन्हे सिद्ध होऊन त्या समारंभाचे वेळीं मी तुरुंगांत खितपत पडेन आणि असा मोठा गुन्हेगार पकडून दिला म्हणून डायरेक्टर त्याला मोठें बक्षिस देतील. दुसरें नाटकरावावरही सरकारी डिटेक्टिव्हची नजर असल्यामुळें नटेशच्या हातून त्याचें कांहींएक नुकसान होणार नाहीं अशीही यांची समजूत आहे. याप्रमाणें त्या समारंभाचे दिवशीं त्यांच्या मतें जिकडे तिकडे निष्कंटक व आनंदी आनंद होणार आहे. मग तो समारंभ ते किती थाटानें करतील हें सांगायलाच नको. शिवाय त्यांच्या आनंदांत भर म्हणून त्याच दिवशीं या गांवांत मुलींची शाळा सुरू करण्याबद्दल सुशीला सर्व बायकांना सूचना करणार आणि ती पास होण्यासारखी असल्यामुळें वसंतराव व सुशीला हें जोडपें सामाजिक पुढारी म्हणून मिरविणार! इत्यादि कारणांमुळें वसंत व सुशीला या दोघांना अस्मान ठेंगणें वाटायला लागेल. परंतु हे त्यांचे निवळ मनचे मांडे आहेत. त्यांच्या नाशाची किल्ली म्हणजे सुशीलेच्या रहस्याचा हा इतिहास मजजवळ आहे. सुशीलेला वाटत होतें कीं वसंतरावांजवळ रदबदली करून नटेशची जागा कायम राखली म्हणजे नटेश खुश होऊन दस्तावेज परत देईल आणि तो एकदां हातीं आला म्हणजे सर्व संकट नाहींसें होऊन नटेशचा कांटा दूर होईल. परंतु हा तिचा भ्रम होता. असलें रहस्य जवळ बाळगून मला बँकेंत जर स्वैर थैमान नाचायला सांपडणार आहे तर मी त्याचा नाश सुशीलेस कसा करूं देईन? हें तिला कळायला हवं होतं! गुलछबू, हें सारें कारस्थान पार पाडायला मला खऱ्या डिटेक्टिव्हची कांहीं व्यवस्था नको का करायला? त्यानें अगदीं ऐनवेळीं येऊन बिब्बा घातला तर? म्हणून मोहनला मीं सांगितलें होतें कीं त्याची अमूक अमूक व्यवस्था कर म्हणून. ती त्यानें कशी काय पार पाडली हें मी त्याला विचारीत आहें. मारामारी हाणाहाणी कांहीं एक नाहीं. त्यांत सारा माझ्या बुद्धीचा प्रभाव आहे! हं, चला मोहनराय, काय तुम्ही व्यवस्था केली तो सांगा. आपणास दुसरीं कामें आज उरकायचीं आहेत. हं, करा सुरवात!

**मोहनराय:**—हकीकत फारशी लांब नाहीं. थोडक्यांत सांगायचें म्हणजे मी जेव्हां त्याला म्हटलें कीं मी नटेशचा साथीदार आहें आणि त्याला पकडून देण्याची मी हमी घेतों तेव्हांच तो खुश झाला. नटेशपासून फुटण्याचें कारण काय म्हणून त्यानें मला विचारलें, तेव्हां मी जरासा गडबडलों; कारण तुम्हीं शिकविलेलें कारण त्याला रुचणार नाहीं, असा मला रंग दिसला; म्हणून मी लगेच दिली थाप ठोकून कीं ( कानांत सांगतों ) झालें. गार झाला—अगदीं ठार झाला ! आणि त्यानें तुम्हाला पकडण्याची सर्व कामगिरी मजवर सोंपविली आहे. संपला इतिहास ! काय गुलबाई किती जणांचे खून दिसले तुम्हाला माझ्या कहाणींत ? नटेशराव, आतां एका माणसाचा चेहरा बघायचा होता !

**गुलछबू:**—अहाहा, एवढयाशा कामगिरीनं अगदीं चढून जायला नको अगदीं ! तुझ्यापेक्षां मीच बहादुरी जास्त गाजविली आहे. आज नाहीं उद्यां अडीच लाख रुपये नटेशरावांच्या हातांत खेळवीन. आहेस कुठें ?

**नटेशराव:**—आपआपल्या परीनं तुम्ही तिघेंही माझ्या सारखींच उपयोगी पडतां आहांत. मोहनरायांनीं माझा तुरुंगवास चुकविला आणि तूं स्वतःसकट कनककांतेची जोड करून दिलीस. अस्तु. मोहनराय, वसंत सुशीला यांची व्यवस्था तुम्हाला सांगून टाकतों आणि मग नाटकरावाच्या व्यवस्थेकडे वळूं ! ज्येष्ठागौरीच्या समारंभांत सुशीला आणि वसंतराव गर्क असतांना त्या दिवशीं त्यांना एक पाकिट मिळेल आणि तें त्यांनीं उघडून वाचल्याबरोबर नाटकांतल्या ट्रान्स्फर सीनप्रमाणें सर्व मनु पालटेल; आणि त्या सुखी जोड्याच्या सुखाची राखरांगोळी व्हायच्या वेळीं मी त्या दोघांना जाऊन भेटेन आणि सांगेन कीं, आग इतक्यावरच थांबणार नसून वसंतरावासकट सुशीलाबाईची अब्रू मी लवकरच चवाठ्यावर आणणार आहें. कदाचित् त्यामुळें नटेशला तुरुंगवास घडण्याऐवजीं वसंत सुशीला या दोघांनाच घडण्याचा संभव आहे !

**गुलछबू:**—पण बाई मी आपली विचारतें हो, रागाऊंबिगाऊं नका ! नाहीं तर इथं काय, मेलीं म्हणतात ना फट म्हणतां ब्रह्महत्या ! मी विचारतें, सध्या खरा डिटेक्टिव्ह मोहनरायांवर विश्वासून स्वस्थ बसेल, पण हें कांहीं फार दिवस चालणार नाहीं. मोहनराय म्हणण्याप्रमाणें कांहींच करीत नाहींत असं पाहून मग तो अगदीं चवताळून सूड उगवील. मोहनरायांनीं आपल्या सर्व अपराधांचा तोंडी पुरावा त्याला दिलाच आहे तेवढयावरच तो आपला घात करूं शकेल हें मी सांगायला हवं असं नाहीं ! त्याची काय व्यवस्था केलीत ?

**नटेशराव:**—मोहनराय, आमची गुलछबू म्हणजे एक चीज आहे म्हणून मी म्हणतों तें उगीच का ?

**गोट्या:**—हो साहजिकच आहे, काय बुद्धि, काय हुशारी काय दूरवर विचार. आमच्या धनीसाबांच्या जवळ राहिल्या म्हणूनच त्यांच्या या गुणांचं चीज झालं. हो साहजिकच आहे ! काय, मोहनराय, मी म्हणतों तें कसें काय वाटतं तुम्हाला ? करालच तुम्ही कबूल. हो, साहजिकच आहे !

**गुलछबू:**—पुरे रे मेल्या तुझं ! हा मेला एकदा कुणाला हरभऱ्याच्या झाडावर चढवायला लागला कीं मग अगदीं ब्रह्स्पतीसारखं बोलूं लागतो ! मेल्याची जीभ जिराफाची आहे !

**मोहनराय:**—गुलबाई, तुमचा प्रश्न महत्वाचा आहे हें मी कबूल करतों, परंतु हें तुम्ही नेहमीं लक्षांत ठेवा कीं नटेशरावांसारख्या असामान्य बुद्धीमान आणि कारस्थानी माणसाच्या नजरेंतून असल्या ढोबळ गोष्टी कधीं निसटत नाहींत. निसटल्याच तर अगदीं क्षुल्लक निसटतात; पण क्षुद्र चुकांची नटेशरावां-सारखे अक्कलहुशारीचे सागर कधींच पर्वा करीत नाहींत. कारण एकेका चुकी-वर दहादहा तोडी त्यांना ठाऊक असतात. अस्तु. सरकारी डिटेक्टीव्हला अशा रीतीनें बरेच दिवस हुलकावणी दिल्यावर एक दिवस त्याचा कायमचा निकाल लावून टाकायचा म्हणजे झालं ! हं–हं अशा घाबरूं नका ! कायमचा निकाल म्हणजे त्याचा खून नव्हे–तो आहे पैशाचा लोभी, अगदीं असा कीं पैशाखातर स्वतःच्या मानेवर सुरी ठेव म्हटलं तर ठेवील. हें मला आपलं त्याच्याशीं जो थोडाबहुत अलिकडे सहवास झाला आहे त्यावरून कळलं ! आतां पुढचं लक्षांत आलंच असेल. यायचंच. आहेच तशी बुद्धिमत्ता ! काय गोट्याजीराव, पुढचं सांग-तील का तुमच्या धनीण बाई ?

**गोट्या:**—अलबत्, सांगतील. हो, साहाजिकच आहे !

**गुलछबू:**—इश्श, त्यांतरे कसली आली बुद्धिमत्ता ? तुम्ही त्याला पैसे चार-णार आणि त्याच्या तोंडाला कुलुप घालणार, इतकें नव्हे तर त्याला आपल्या मंडळींत सामील करून घेणार हेंच ना ?

**गोट्या:**—मोहनराय, झालांत चीत शेवटीं ! हो, साहजिकच आहे !

**नटेशराव:**—माझी प्यारी गुलछबू ! ( जवळ घेतो. ) गोट्या म्हणतो तें खरंच. मजजवळ न राहतीस तर तुझ्या अशा अमोलिक बुद्धिमत्तेचं चीज कोणीं केलें नसतें. तेव्हां मोहनराय, वसंत सुशीला यांची व्यवस्था ही अशी ! सरकारी डिटे-

क्टिव्ह खानबहादुर मि. दिलावरखां यांची तशी बोळवण ! पुरावा सिद्ध न झाल्यानें मी पुनः मोकळा आहेंच ! आतां आपल्या या कपट नाटकाच्या चवथ्या अंकाला म्हणजे नाटक–रमा या जोडीच्या संभावनेचा विचार करूं या ! मोहनराय, तुम्ही सरकारी डिटेक्टिव्ह, वसंतराव आणि सुशीला ही त्रयी मीं सांगितल्याप्रमाणें आपल्या जाळ्यांत फसलेली असूं द्या. गुलछबू, प्रेमरसाचा प्रभाव नाटकरावाला आतां नीट उमजला आहे तेव्हां त्याचा फायदा कसा आणि किती घ्यायचा हें मीं तुला समजाऊन दिलेंच आहे. अशाच चेष्टा चालू ठेवून त्यानें मजजवळ जें औषध मागितलें आहे तसलें औषध तयार करण्यासाठीं आपणास खर्च पाहिजे. तो कसा मिळवायचा हेंही मीं तुला सांगितलें आहे. यापुढें आपणास द्रव्याची फार जरूर आहे. मोहनरायची कामगिरी बहुतेक संपत आली आहे. तुझी राहिली आहे तेवढीच तूं आतां लवकर उरकून टाकलीस म्हणजे वसंत सुशीला आणि डिटेक्टिव्ह, तसंच नाटकराव आणि त्याची संपत्ति या सर्वांची नीट व्यवस्था लागलीच समजायची, आतां राहिली रमा. तिचाही मी विचार योजून ठेवला आहे व ती कामगिरी गोब्याजीराव तुम्हींच पार पाडली पाहिजे. लागल्यास या मोहन-रायाची मदत घे. आतां मी जातों. मला या सुशीलेच्या पाकिटाची योग्य ती व्यवस्था करायची आहे. तेव्हां मी तिकडेच निघालों आहें. आतां गोब्या, तुला आणखी कांहीं मला सांगायचें आहे तेव्हां तूंही माझ्या मागोमाग येऊन गांवाबा-हेरच्या त्या आपल्या झाडाखालीं उभा रहा. तिथं मी तुला लवकरच भेटेन. बरं आहे गुलछबू, माझी प्यारी, संभाळून वाग बरं का. आतां हा शेवटचा खरा गोळीबार आहे. एकदां हें प्रकरण संपलं कीं तुझ्या माझ्या आणि या जानी दोस्तांच्या सुखाला पारावार उरणार नाहीं. गोब्या, ऊठ तूं आधीं आपल्या नोक-रीवर जा आणि परवानगी घेऊन तिकडे निघून ये ( दोघे जातात ). ( मोहन क्रुद्ध नजरेनें आणि गुलछबू स्तब्धपणें दोघे जातात तिकडे पाहतात व मग लगेच एकमेकांकडे पाहूं लागतात. गुलछबू जाऊं लागते. )

**मोहनरायः**—ताई, जाऊं नकोस.

**गुलछबूः**—आतां काय काम आहे इथं ? तूं असा कां बघतोस ?

**मोहनरायः**—ताई, तूं हें मुद्दाम वेड पांघरते आहेस. माझ्या या असल्या बघण्याचा तुला पूर्ण अर्थ कळतो आहे. तुझ्या स्थितीचा प्रकाश अजून तुझ्या डोक्यांत पडला नाहीं काय ?

**गुलछबू**ः—माधव, मीं तुला मघाशींच सांगितलं ना कीं आतां त्याचा कांहीं उपयोग नाहीं म्हणून ?

**मोहनराय**ः—त्याचा उपयोग करण्याची हीच संधि उत्तम आहे. अजून नटेश तुझं माझं काय करणार आहे हें तुला कळलं नाहींसं दिसतं. ऐक तर वसंतराव सुशीला आणि नाटकराव या त्रयीचा नाश केल्यानंतर रमा, नाटकरावाची संपत्ति आणि बँकेच्या मॅनेजरची जागा ही त्रयी तो हस्तगत करणार. तुला सोडून तो रमेला आपलेजवळ ठेवणार आणि यासाठीं तिला वश करण्याची खटपट त्यानें रेवडी व गोठ्या यांच्याकडून कधींची चालविली आहे. मघाचं त्याचं भाषण आणि गोठ्यास त्या झाडाखालीं भेटण्यास सांगणं, तुझ्या समोर त्या रमेच्या प्रकरणाचा उल्लेख न करणं व गोठ्याच्या कामांत माझी मदत होणं या साऱ्यांचा अर्थ काय होतो ? नटेशाचं तुजवर प्रेम ना ? मग आतां रमेवर त्याची नजर कां ?

**गुलछबू**ः—माधव, नटेशराव त्या रमटलीचं काय करणार याबद्दल मला अलीकडेच उलगडा होऊं लागला आहे; आणि मी तुला तेंच विचारणार होतें. ! माधव, मला हें त्यांचं करणं अगदीं सहन होणार नाहीं. रमा जर का त्यांच्या म्हणण्यास कबूल झाली तर माझी येथें काय किंमत आहे ?

**मोहनराय**ः—आतां पुढें आणखी ऐक. सरकारी डिटेक्टिव्हला वश करण्याचे त्याचे उपाय चालूच आहेत आणि मिस्टर दिलावरखांच्या द्रव्यलोभी स्वभावामुळें तो नटेशच्या हातांतलं बाहुलं लवकरच होणार याबद्दल मला आतां शंका नाहीं. दिलावरखां हस्तगत झाल्याबरोबर नटेश मजवर सर्पासारखा उलटेल. बनावटसहीच्या या सर्व गुन्ह्यांचं खापर तो मजवर फोडील आणि दिलावरखांच्या सरकारी मदतीनें मला तो तुरुंगांत घालील. रमा वश झाली कीं तुझ्या ढुंगणावर लाथ मारून तो तुला नेसत्या लुगड्यांनिशीं देशोधडीला लावील. याप्रमाणें तुझा माझा दोघांचा कांटा दूर करण्याचे त्याचे डाव अहर्निश चालू आहेत. मी बघतों आहें सारं, पण तूं मात्र स्वस्थ झोंपते आहेस !

**गुलछबू**ः—मी एक झोंपतें आहें पण तुला हें सारं कळत असून तूं मला कां कळविलं नाहींस ? किंवा मग असा बेशरम्यासारखा आजपर्यंत राहिलास कां इथं ? आजपर्यंत कुठें गेली होती तुझी बुद्धि, चुलखंडांत ?

**मोहनराय**ः—ताई, आजपर्यंत मी येथें बेशरमासारखा नव्हे कुत्र्यासारखा कां राहिलों ? पुरुषासारखा पुरुष मी असून माझ्या प्रत्यक्ष बहिणीस नटेशासारखा

बिलंदर चोर प्यारी म्हणतो आणि मी तें सहन कां करतों ? माझ्या प्रत्यक्ष बहिणीला रांडेचा धंदा कोणीं शिकवला ? माझी प्रत्यक्ष बहीण इतकी नीच झाली कीं आपल्या जातकुळीचा, धर्माचा सर्व अभिमान सोडून आपल्या पाठच्या भावासमक्ष पर पुरुषाजवळ रांड म्हणून रहाते ? ताई या दुष्ट आणि माझ्या काळजाला चरचर चिरणाऱ्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यासाठींच मी आजवर नटेशचा उष्टा तुकडा खाऊन त्याच्या दारांत कुत्र्यासारखा लोळत राहिलों ! त्या दुष्ट प्रश्नांचीं उत्तरें देण्याची संधी आजवर नव्हती म्हणून तुलासुद्धां न कळवितां माझ्या सूडबुद्धीच्या रोपाला मी आजवर पाणी घालून त्याचा वृक्ष तयार केला. रांड झाली तर काय झालं, आपल्या विषयसुखाची भागीदार कोणाही स्त्रीला खपत नाहीं. रमेची सवत तुला दिसल्याबरोबर माझं म्हणणं तूं निदान ऐकून तरी घेशील असं मला वाटलें. दुसरी गोष्ट अशी कीं, ताई लपवूं नकोस पण अंतर्यामीं नाटकरावाचा सहवास तुला पसंत आहे ! नटेशचा ताबा झुगारून नाटकरावाजवळ राहण्याची तुझी इच्छा आहे ! नाटकरावावर तुझं प्रेम बसलं आहे आणि नाटकरावानें आपल्या प्रेमविषयक-प्रामाणिक वर्तनानेंच तुझं मन आकर्षित केलें आहे हें मीं ओळखलं आहे, म्हणून आज मी तुझ्या जवळ उघड बोलण्याचें साहस करतों कीं तुझ्या माझ्या बद्दलच्या सूडाखातर मी नटेशचा घात केल्याखेरीज राहणार नाहीं व ती नामी संधी आतां आली आहे !

**गुलछबू:**—नाटकरावांचा घात होऊं नये असं मलाही वाटतं आणि त्याच्या जवळ राहायला मिळावं ही माझी इच्छाही कांहीं खोटी नाहीं. पण माझ्या इच्छेविरुद्ध नाटकरावाचा घात करण्याची कामगिरी मजकडे आहे आणि यांतून कशी सुटूं ही मला मोठीच काळजी लागली आहे !

**मोहनराय:**—त्यांत कांहीं कठिण नाहीं. मी तें तुला सांगतों सारं ! मी काय काय करायचं ठरविलं आहे तें तुला समजलं म्हणजे मुकाट्यानें ऐकशील माझं ?

**गुलछबू:**—मला बाई भीति वाटते ! अरे नटेशराव कोणी साधा का मनुष्य आहे, कीं तू आपला सहज त्याला फसवशील आणि आपला दोघांचा सूड उगवशील ? कांहींच्याबाहींच करूं नकोस आणि आपला जीव धोक्यांत घालूं नकोस. माधव, माझं चरित्र जरी आतां भ्रष्ट आणि दुःखी आहे तरी पाठचा भाऊ जवळ आहे, सुरक्षित आहे ही त्या अनेक दुःखांच्या टोंचण्यांतसुद्धां मला सुख देणारी गोष्ट आहे. म्हणून म्हणतें आपल्या बहिणीचं एवढं सुख तरी घालवूं नकोस ! माधव, मी अत्यंत पापी आहें, आईबापांच्या आणि सासु सासऱ्यांच्या दोघांच्याही कुलाला

मी कलंक लावला. कलंक लावून पापं करूनही मी सुखी झालें नाहीं ती नाहींच. माधव, माझा त्याग न करतां तूं मजजवळ कुम्प्याच्या वृत्तीनें कां होईना पण राहिलास यावरून माझी माया कांहीं तूं सोडली नाहींस हें सिद्ध झालं आणि तेवढ्यावरच मी हे पापी दिवस कंठीत आहें ! ( रडूं लागते. )

**मोहनराय**:—ताई, आतां रडत बसण्यापेक्षां मी सांगेन तें करूं लाग ! तुझा पश्चात्ताप अशा रीतीनें बाहेर पडावा यांत नवल नाहीं. पिढीजाद कुलीन तरुणी रांडेचा धंदा जरी करूं लागली तरी अंगीं भिनलेल्या पीढीजाद सर्वच सात्विक भावनांचा नाश तिच्या ठिकाणीं होणार नाहीं. आणि एकच सात्विक भावना जर कांहीं कारणांनीं अनावर झाली तर तिच्या पुढें कोणत्याही तामसी विकारांचें तेज पडत नाहीं. बरं, मी जातों पुढच्या व्यवस्थेकरितां.

[ पडदा पडतो. ]

---

# अंक ४ था

## प्रवेश २ रा

[ नाटकरावाच्या वाड्यांतील गुलछबूचा दिवाणखाना. गुलछबू येते. ]

**गुलछबू**:—माधवाच्या मनांतून अलीकडे सुडाचे विचार पार मावळले असतील असं मला वाटत होतं. त्याचें वागणें अलीकडे किती गरिबीचें आणि शांतपणाचें झालें होतें. नटेशराव एवढे धूर्त पण त्यांना संशय कसा तो आला नाहीं. उलट त्यांचा विश्वास मात्र माधवावर जास्त बसला आहे. त्याच्या सारख्यांना सुद्धां माधवानें चकविलें मग मी तर मेली बोलून चालून अबला ! काय त्याची हुशारी बाई ! यांना वाटतं आहे कीं मोहनराय म्हणजेच खरे सरकारी डिटेक्टिव्ह ! इकडे नटेशराव, गोव्या वगैरेंना वाटतं आहे कीं, हा आपल्याच तंत्रानें चालतो आहे. असं हें दुटप्पीपणाचं वर्तन कशासाठीं ? तर आमची दोघांची सुटका व्हावी आणि आम्हाला आडमार्गांत नेल्याबद्दल त्या नटेशरावांवर सूड उगवावा म्हणून ! नटेशरावांनीं मला सांगितलं आहे कीं नाटकरावांस खूप दारू पाजून तिच्या धुंदींत त्यांजकडून एक लाखांच्या चेकवर सही करवून बँकेंतून रकम काढण्याबद्दल लेखी परवानगी घे म्हणून. इकडे आमच्या माधवानें सांगितलं आहे कीं मी नटेशरावांच्या म्हणण्याप्रमाणें वागावें. इतक्यांत

त्यांना पकडण्याची व्यवस्था तो करणार—बाकी योजना कांहीं वावगी नाहीं. देवा! माझ्या माधवाला यश दे! या पुढचं आयुष्य तरी आमचं सन्मार्गानें वागण्यांत आणि पूर्वीचीं पापं धुण्यांत जाऊंदे–अगबाई, कोणी आलं वाटतं! इश्श माधवच हा! ( मोहन येतो. ) कां रे, कुठें आहेत मंडळी ?

**मोहनराय**:—( हळूच ) तुला सांगायला आलों आहें कीं ज्या वेळीं नाटकराव लेखी परवान्यावर सही करूं लागतील, त्या वेळीं खुणेसाठीं कांहीं तरी आवाज होईल असं कर. ( व्हेसकडे पाहून ) अग, हें बरं आहे बघितलंस का ? पण नाहीं हेंही ठीक नाहीं. काय युक्ती करावी बरं ? ( विचार करतो ).

**गुलछबू**:—मी सांगूं का. तशी वेळ आली कीं मी आपली हारमोनियमच्या पेटीवर बसून कांहीं तरी वाजवीन आणि तो सुर ऐकून तुम्ही या म्हणजे झालं!

**मोहनराय**:—हां–हां!! कल्पना चांगली आहे, पण एक शंका अशी येते त्यांत, कीं नाटकराव किंवा नटेश यांपैकीं कोणास लहर येऊन मध्येंच ते वाजवूं लागले आणि आम्ही आपले शिरलों आंत म्हणजे साराच घोंटाळा व्हायचा. तेव्हां तूं असं कर कीं लहानपणीं आईनें तुला तें पद शिकविलें आहेना 'भक्ता साठीं तो जगजेठी!' तें पद तूं वाजवूं लागलीस कीं तुझी वाजविण्याची पद्धत मला ठाऊक असल्यानें हें पद तूंच वाजविते आहेस हें मी तत्काळ ओळखीन आणि मग पुढचें तुला सांगायला नकोच! बरं, नाटकराव आणि नटेश बसले आहेत त्या दिवाणखान्यांत. नटेशरावांनीं आज 'ब्लॅक व्हाईट' उत्तम व्हिस्की आणली आहे आणि देतो आहे सोड्याबरोबर डोसचे डोस. तुझ्याकडे स्वारी येईल ती अगदीं दारूच्या घोड्यावर स्वार! मी आतां जातों, पुढची व्यवस्था बघायला. आजचा डाव साधणार यांत मला बिलकुल शंका नाहीं, तरी त्या भगवंतानें आम्हांवर कृपा करावी म्हणून प्रार्थना कर! ( जातो. )

**गुलछबू**:—माधवाच्या आजच्या डावावर आमचं सारं जीवित अवलंबून आहे. डाव साधला तर सन्मार्ग आणि डाव फसला तर मृत्युमार्ग अगदीं ठरलेला! भगवंता नारायणा, आई अंबाबाई, आम्हा लेंकरांवर दया कर! ( रेवडी येते. )

**रेवडी**:—बाईसाहेब, चला घाई करा, नाटकराव अगदीं धडपडत येत आहेत त्यापलीकडच्या दिवाणखान्यांतून.

**गुलछबू**:—आणि नटेशराव कुठें आहेत. अगबाई! ( दोघी गडबडीनें जातात. नाटकरावास नटेश व गोट्या सावरून धरून आणीत आहेत. नाटकराव बडबडतो. )

**नाटकराव:**—नटेशराव, गुलछबू, परिणाम झाला नाहीं. अगदीं परिणाम नाहीं झाला! कां झाला नाहीं? आमच्या प्रेमाबाईला मी तो प्रेमरस पाजला पण परिणाम झाला नाहीं. बिलकुल झाला नाहीं!!

**नटेशराव:**—(त्याला तक्याशीं बसवीत) अरे, नाहीं झाला तर नाहीं झाला! तें औषध कांहीं खोटें होऊं शकत नाहीं. कदाचित् डोस कमी झाला असेल म्हणून नसेल झाला परिणाम! त्यांत काय एवढं, पण जाऊं दे! त्या गांवढळ बायकोला घेऊन तूं काय करणार आहेस?

**नाटकराव:**—काय करणार आहें म्हणजे? बराच आहेस कीं रे तूं! म्हणे काय करणार आहेस? तिला प्रेमरस पाजून माझ्यासारखी, तुझ्यासारखी या गुलछबू-सारखी, रेवडीसारखी, या गोट्यासारखी रंगेल बनविणार—प्रेमट बनविणार! म्हणे काय करणार आहेस तूं!! वाहवारे! वाहवा!!

**नटेशराव:**—नाहींतर तूं पाजायला चुकला असशील. कसा दिलास तो प्रेम-रस तिला?

**नाटकराव:**—कसा दिला म्हणजे? चांगला दिला! जसा द्यायचा तसा दिला. अरे, मी स्वतः असा पेला भरला. (भरूं लागतो तो व सांडतो.) आणि हा असा तिच्या तोंडाशीं लावला; पण ती पिईना. मी म्हटलें पी, ती म्हणे पिणार नाहीं. मला आला राग. माझं कोणीं ऐकलें नाहीं म्हणजे मला येतो राग. मला आला राग आणि ही अशी तिची मानगूट धरली आणि पाडली भुईवर आणि बाटलीच्या बाटली तिच्या तोंडावर उपडी केली. तिचा जीव गुदमरला, पण मीं बिलकूल फिकिर केली नाहीं. बाटली पालथी झाल्याबरोबर तो प्रेमरस तिच्या नाकांत गेला, तोंडांतही पुष्कळ गेला, माझ्यावर थुंकायला लागली, धडपड करूं लागली, पण मी कसचा सोडतों तिला. प्रेमरसाचे दहापांच तरी घोट गेलेच तिच्या पोटांत!

**नटेशराव:**—भले, शाबास बहाद्दर! खासा पराक्रम गाजविलात आपण, आणि म्हणूनच हा सारा घोटाळा झाला. अरे न कळत थोडासा किंवा तिचं मन वळवून राजीखुशीनें प्रेमरस पाजला असतास म्हणजे परिणाम झाल्यावांचून राहील ही गोष्टच बोलूं नकोस!

**नाटकराव:**—असं झालं तर? मग हें तूं प्रथमच कां नाहीं सांगितलें मला? बरं तर आतां तसं करून पाहीन. गुलछबू, माझं आवडतें प्रेमरसायनाचें सरबत तयार कर! कर लवकर!! (गुलछबू करायला लागते व नटेशला म्हणते.)

**गुलछब्बूः**—नटेशराव, यांना तुम्ही दारू जास्त पाजली आहे त्यामुळें आपल्या कामाला व्यत्यय येईलसं दिसतं. सही करायला त्यांचा हात तर नीट असला पाहिजे ना ?

**नटेशरावः**—जरा स्ट्राँग झाली खरी त्याला ! आतां असं कर त्याला दारू पाजण्याच्या ऐवजीं ही पुडी त्या गुलाबाच्या सरबतांत घालून नुसता सरबताचा धडाका चालू ठेव म्हणजे थोड्या वेळानें त्याला एक ओकारी होऊन तो बराच शुद्धीवर येईल आणि तसा तो आला कीं आपलं काम साधून घे. तोंवर मी थोडा जाऊन येतों. मला दुसरें काम आहे. माझी वाट पाहूं नकोस. गोव्या, रेवडी आहेतच तुझ्या मदतीला. मोहनराय गेला आहे त्याला इतक्यांत वसंतरावानें बोलाविलें म्हणून. तो आतां तेथें नुसत्या थापा मारील झालं. गोव्या, रेवडी तुम्ही असेच अंमळ दाराबाहेर बसा आणि ही हांक मारील तेव्हां या. ( जातात. )

**गुलछबूः**—( घाबरून ) हें काय बाई भलतंच झालं ? माधव तिकडे वसंरावाकडे गेला हें ठरलेलेंच होतं; पण हे नटेशराव इथं राहायचे ते कुठें गेले बाई ? आतां माधवाचें कारस्थान कसं साधणार ? देवा, कां बरं असा आमचा अंत पाहतोस ? अगबाई—( नाटकराव चळवळ करतो. )

**नाटकरावः**—गुलछबू, मी तुझा अंत पहात नाहीं पण तूं माझा अंत पहात आहेस. प्रेमरसायन कुठें आहे ? मला तहान लागली आहे ! रसायन आण ! मला विचारते माझा अंत कां पहातां म्हणून ? प्यारी गुलछबू—माझी दिलजान-अस्मानची परी–पाज पाज तें प्रेमामृत ! माझ्या मांडीवर बसून तूं मला पाज ! तुझं उष्टं मी पिणार आहें. आधीं तूं पी. नाहीं मी तुला पाजणार—आण इकडे तो गलास ( पुडी टाकलेला पेला बदलून दुसरा देते. तो तिला पाजतो नंतर ती त्याच्या मांडीवर बसून पाजीत बसते. )

[ पडदा पडतो. ]

---

## अंक ४ था

### प्रवेश ३ रां

[ मोहनराय, दिलावरखां व इतर चार पोलिस शिपाई सशस्त्र येतात ]

**मोहनरायः**—( हळूच ) खांसाहेब, आपला थोडासा घोटाळा झाला आहे. खरा, पण आतां त्याची भीति उरली नाहीं. आमची ताईही गोंधळून गेली होती.

तिची समजूत घालण्यासाठीं जरा तिच्याशीं बोलत होतों म्हणून थोडा उशीर झाला. नटेशनं असा घाट घातला आहे कीं तिकडे गुलछबू नाटकरावाकडून चेक-वर सही घेते आहे, आणि त्याची मर्जी संभाळण्याच्या धांदलींत गुंतली आहे तोंवर म्हणजे अर्थात् या घटका दोन घटकांच्या अवधींत रमाबाई संबंधाची आपली नीच मनिषा तृप्त करून घ्यावी. हें त्यानें गोव्या खेरीज कोणालाच सांगि-तलें नसल्यानें आमची अशी समजूत होती कीं नाटकराव सही करतो आहे त्यावेळीं नटेश तेथें हजर असेल. अस्तु. आपलें कांहीं फारसें नुकसान झालें नाहीं. आपला हेतु एवढाच आहे कीं नटेशला कसला तरी गुन्हा करीत असतांना ऐन वेळीं पक-डायचा. हा आपला हेतु असा नाहीं तसा सिद्ध होणार. बळजबरीची सही घेत असतांना नाहीं तर परस्त्रीवर बळजबरी करतानांच आपण त्याला पकडूं या. मी पुढची सारी योजना गुलछबूला समजावून आलों आहें. तीं आपलें काम करी-लच. तुम्हीं आतां असें करा. तुम्हीं दोघे एक या अंगाला आणि एक त्या अंगाला असे दबा धरून बसा. तुम्ही दोघे त्या कपाटाच्या मागें लपा आणि आम्ही दोघे या वरच्या माडीवरच्या जिन्यांत बसतों. खांसाहेब, चला या. तुम्हीही चला. ( जातात. )

---

## अंक ४ था

### प्रवेश ४ था

[ गुलछबूच्या दिवाणखान्यांतील खोली ]

**नटेशरावः**—आज इतके दिवस खेळत असलेल्या कपट नाटकाचा शेवट असा माझ्या मनासारखा होत आहे. नाटकरावास व्यसनांत बुडवून पैशानें नाग-विलें, वसंत सुशिलेच्या अब्रूवर मी सुरंग लावून ठेवलाच आहे व तो यथाप्रसंगीं भडका उडवीलच. आतां एकदां रमा हस्तगत झाली कीं नाटक संपलें! ( समोर पाहून ) आलाच गोव्या आतां. प्रथमतः गोडी गुलाबी करून पाहतों आणि नच बळली तर आहेच मग आपला पुरुषीउपाय! ( रमेच्या तोंडांत बोळा देऊन तिला ओढीत ओढीत गोव्या व रेवडी आणतात व चालते होतात. )

**नटेशरावः**—( तिच्या तोंडांतून बोळा काढतो. ) रमाबाई, तुमचा सन्मान करण्याची ही रीत नाहीं पण नाइलाजास्तवच ही पद्धत अमलांत आणावी लागली आणि याबद्दल मी आपली मनःपूर्वक क्षमा मागतों.

**रमाः**—मेल्या, असा कपटानें आमचा गळा कापलास त्यापेक्षां माझं मढं कां केलं नाहींस म्हणजे सुटला होतास एकदाचा! एवढयाच साठीं त्या मेल्या गोब्याला आमच्या घरांत आणलास आणि चांडाळा त्या भ्रष्ट बाजारबसवीच्या बटकीला माझ्या घरांत सैंपाकीण म्हणून ठेवलंस! तिकडे दारूचें व्यसन लावून पैशाचा आणि शरीराचा सत्यनास केलास. आजपर्यंत आमचें सारं व्याजाच्या रकमेवर भागत होतें, पण मेल्या ती गुलछब्बू अवदसा घरांत आल्यापासून आतां अर्धीसुद्धां रकम बँकेंत राहिली नाहीं. आम्ही असं काय तुझं घोडं मारलें होतें कीं तूं आमचा असा घात केलास?

**नटेशरावः**—आमच्यासारख्या पराक्रमी बहाद्दराचे कोणी घोडे मारावे लागत नाहीं. आम्ही आपसुखच तुमच्या सारख्या उल्लूच्या बाजारांत हिंडतों आणि तुमच्यासारखीं रत्नें हुडकून काढतों. रमाबाई, माझ्या कारस्थानाचा जो तुम्ही आतां पाढा वाचलात, जो माझा गौरव केलात, माझ्या अकलेची तारीफ केली ती अशी रागाच्या सुरांत व रागाच्या शब्दांत न करतां अनुरागाच्या सुरांत करूं लागलांत तर तुम्हाला मला दोघांनाही आनंदच आहे. तुमचा राग व्यर्थ आहे. अहो, तुमचें हें मी हितच करतों आहें. पहा, नाटकराव तुम्हाला प्रेमानें वागवितात का? तुमच्या हौशी पुरवितात का? तुमची घरांत कांहीं किंमत आहे का? तुमचा नवरा व्यसनी, उल्लू आणि आतां पैशानें भणंग. कारण गुलछबूनें बाकी राहिलेल्या लाख रकमेच्या चेकावर त्या उल्लूची सही आतां घेतलीच असेल? तुम्हाला मुळीं सुखच नाहीं. तें सुख तुम्हाला मिळावें म्हणून ही माझी सारी खटपट आहे. गुलछबूला जाऊन विचारा ती हेंच सांगेल. तीही आपल्या घरीं अशीच दुःखांत होती. बिचारीची सासू होती द्वाष्ट; ती तिला बरं पाहीना. नवरा तर केवळ लांडगाच होता. त्या दोघांनीं हिला रोज छळायचें. धड अन्न नाहीं धड वस्त्र नाहीं, मग इतर तारुण्याच्या हौशींना कोण विचारतो! अशी तिची स्थिति होती. इतक्यांत गांवांत प्लेग उद्भवून तिचे आईबाप आणि नवरा हीं मरण पावलीं. हिच्या पायगुणानें आपला मुलगा मेला म्हणून त्या थेरडीनें हिला घरांतून घालवून दिलें; आणि आपण आपल्या भावाकडे चालती झाली. तिला एक धाकटा भाऊ होता. आमचा मोहनराय हाच तिचा धाकटा भाऊ. या दोघांना शेवटीं अनाथ म्हणून मी घरांत बाळगलें. पुढें तिचें तारुण्य व्यर्थ जाऊं नये म्हणून गुलछबूनें आपलें पूर्वीचें नांव बदलून वरकांती हा पेशा स्वीकारला; परंतु ती माझ्या पुरती कह्यांत आहे, पहा तिला कसें सुख झालें तें! मी तुम्हाला अंमळ

निराळें सांगतों कीं ( रमा कानांवर हात ठेवते ) माझ्याबरोबर चला. तुमच्यासाठीं मी येथील बँकेची मॅनेजरी सुद्धां सोडून देईन. परगांवीं आपणांस कोणी ओळखणार नाहीं. आपण कलकत्त्यास, किंवा लाहोरास जाऊन राहूं. तेथें माझी रांड म्हणून न म्हणतां माझी बायको म्हणून रहा आणि अशा रीतीनें आपण सुखानें संसार करूं! मी म्हणतों यांत वावगं काय आहे तें बोला ? ( जवळ जातो; ती दूर होते. )

**रमाः**—मेल्या अंगाला हात लावूं नकोस, दुरून काय आणखी विषं ओकायचीं आहेत तीं ओकत बैस. लगट केलीस तर ओरडून सारे रस्त्यावरचे लोक जमा करीन.

**नटेशरावः**—ओरडलीस तर मजपेक्षां तुझेंच नुकसान जास्त आहे. तुझीच अब्रू चवाठ्यावर येईल. शिवाय असं आहे कीं लागेल तितकी ओरडलीस तरी या वेळीं तुझं कोणी ऐकणार नाहीं. मीं सारा बंदोबस्त केला आहे. तुझी ओरड घराबाहेर जाईल तेव्हांना लोक जमणार ? प्यारी रमा, माझी मनोरमा, मी आजवर किती धीर धरला म्हणून सांगूं ? असा त्रागा करूं नकोस. अग बँकेचा मॅनेजर, पांच लाख रुपयांचा धनी, विलक्षण बुद्धिमत्ता आणि अचाट सामर्थ्य या सर्वांचा मूर्तिमंत पुतळा मी तुझा चाकर होऊं म्हणतांना तूं मला झिडकारावेंस हें योग्य नाहीं. अग थंडगार चांदणं अंगावर पडूं म्हणत असतांना अरसिकाप्रमाणें त्याच्या आड वस्त्र कोण धरील ? वेडी कुठली, आतां पुरे कर हें खोट्या रागाचें उसनें नाटक—( तिच्याशीं लगट करतो. ती धडपड करते तोंच वसंतराव, मोहन, दिलावरखां, नाटकराव, गुलछबू वगैरे मंडळी येतात. गोव्या व रेवडी कैद आहेत. नटेशला पकडून कैद करतात. )

**वसंतरावः**—नाटकराव, हे तुमचे परम प्राण प्रेमळ मित्र नटेशराव ऊर्फ डॉ. प्रेमाजीराव प्रणयराव प्रीतीवाले. डोळे फाडफाडून बघा आतां. यांचें हें प्रेम, हा प्रणय आणि ही प्रीति किती सभ्य व माणुसकीची आहे! दगलबाज, हरामखोर, विश्वासघातकी !!

**नटेशरावः**—मूर्खा, ह्या शिव्या मला उच्चारीत आहेस त्या साऱ्या आणि इतर तुझ्या शिलकेंत असलेल्या तुझ्या बायकोसही तूं न देशील तर आमच्यासारख्यांचं जीवित आणि अवतार व्यर्थ आहे असं मी समजेन, या प्रकरणीं दगा कोणी दिला तो मला कळतो आहे. पण माझं केंसभरही यांत वांकडं होणार नाहीं. नटेशची बुद्धी येथेंच थकली नाहीं. मी येथें कांहींच बोलूं इच्छीत नाहीं. चला,

मला कोठें घेऊन जाणार तें घेऊन चला. बाकी असिस्टंट मॅनेजरची अब्रू घेत-बद्दल मी तुम्हाला सरकारकडून योग्य प्रायश्चित्त देववीन. समजलांत काय तुम्हीं ? (त्याला व इतरांना घेऊन सर्व जातात. नाटकराव ओशाळा होऊन रमेकडे पहातो आणि तिच्यासमोर गुडघे टेकतो.)

**नाटकराव:**—प्रेमाबाई, मला क्षमा करा. नटेशनं आणि गुलछबूनें माझ्या डोक्यांत झणझणीत अंजन घातलें आहे. प्रेमाच्या भलत्या व्याख्या करून नटेशनं माझें प्रेमाचें वेड अधिक वाढविलं. प्रेमाची माझ्या हातून आजपर्यंत नुसती विटंबना झाली. तुझी मी व्यर्थ छळणूक केली. (पायां पडतो.)

**रमा:**—(वर उचलून) हें काय असं करायचें तें ! गंगा उलटी का वाहील ? आपण कांहीं केलं नाहीं ! त्या मेल्या नटेशनं आणि गुलटीनें इकडे भुरळ नसती घातली तर आज हा प्रसंग न येता. चला, झालें तें झालें. मी अंबाबाईचे एवढे आभार मानतें कीं तिनें माझे देव माझ्या पुनः ओटींत घातले. आपणास नाटकी प्रेमाचा अनुभव असा आल्यानें मजवरची आपली माया यापुढें आपण पातळ करणार नाहीं हें माझें केवढें भाग्य !

**नाटकराव:**—लाडके रमे, तूं आणि मी केवढया घोर संकटांतून बचावलों आहों म्हणून सांगूं ? खरं पाहिलें तर हा सारा तुझ्या पुण्याईचा खेळ आहे. नकळतच संकटें आपणावर आलीं आणि आतां नकळतच तीं नाहीशीं झालीं हा केवढा चमत्कार ! वसंतराव तेवढा मघाशीं माझ्या दुःखावर डागण्या देण्यासाठींच जणूं आला होता अशा प्रसंगीं माझें शांतवन करायचें तें उलट टोंचून बोलला !

**रमा:**—उगीच गडे त्यांना दोष लाऊं नये ! वसंत भाऊजींचीच ही सारी कृपा आहे. त्यांनीं मनावर घेतलें नसतें तर तुमचे आमचे आणखी काय काय हाल झाले असते ते भगवान जाणें !

**नाटकराव:**—रमे, काय म्हणतेस सारी वसंतरावाची कृपा ! त्यानें मला घरां-तून घालवून दिलें आणि इतःपर मजकडे येऊं नकोस म्हणून बजावलें ही सारी कृपाच का ?

**रमा:**—मी सांगतेंना ? अतां तरी त्यावर विश्वास ठेवायचा होता ! वसंत भाऊजींनीं आपला स्नेहधर्म खरा गाजविला. त्यांनीं इकडचें नांव सोडलें तें खरं नाहीं. त्यांत आपल्या हिताचें मोठें कारस्थान होतें. तें सगळें मी मागाहून नीट समजाऊन सांगेन इकडे. आतां इथें कशाला त्या गोष्टी ? चलायचें आंत !

**नाटकराव:**—तूं म्हणतेस तें बरोबर आहे. थोडथोडं माझ्याही लक्षांत येऊं लागलं आहे. माझी चूक झाली असली तर माझा वसंत मला क्षमाच करील हें आतांच्या त्याच्या वर्तनानें सिद्ध झालें. रमे लाडके इथून मी इतक्यांत हलायचा नाहीं. गुलछबूच्या आणि नटेशच्या नादीं लागून मी खऱ्या प्रेमाच्या सुखाला आजपर्यंत आंचवलों होतों. गुलछबूच्या पापमय आलिंगनानें आणि तिच्या विष-मय चुंबनानें माझा नखशिखांत देह पतित आणि भ्रष्ट झाला आहे. तेव्हां माझं मन जसं तूं पावन केलेंस तसं शरीरही पावन केल्याशिवाय मी या जागेवरून हालणार नाहीं. आतां घरांत प्रवेश करायचा तो तुझ्या प्रेमालिंगनानें आणि प्रेमचुंबनानें पवित्र होऊनच करायचा असा माझा निश्चय झाला आहे.

**रमा:**—कडू कारलं तुपांत तळलं साखरेंत घोळलं तरी आपलं कडूच! चांगली खोड मोडली गेली तरी नाटक करण्याची लहर कांहीं कमी झाली नाहीं. मी येथें कांहीं घ्यायची नाहीं न द्यायची नाहीं. चांगलें घरांत चलायचें. देवघरांत जाऊन देवाच्या पायां पडायचं, मग पुढचं पुढं. (लाजते.) चलायचं ना घरांत! इथं नको गडे—उघडी जागा—कोणी पाहील—ऐकायचं गडे!

**नाटकराव:**—धडधडीत खोट्या प्रेमाचा हलकट रांडेच्या नाटकी प्रेमाचा दुर्विलास—हो दुर्विलासच तो—भोगीत असतांना मी कोणाची लाज धरली नाहीं आणि आतां खऱ्या प्रेमाच्या सोहाळ्याकरितां लाज धरूं म्हणतेस? रमे, आज-पर्यंत कधींही ज्या प्रेमानें मी तुला हांक मारली नाहीं, ज्या प्रेमाची याचना केली नाहीं, ज्या प्रेमानें तुला वागविलें नाहीं त्या प्रेमानें रमे, माझ्या लाडके रमे, तुला विनंती करतों आहें. काय, नाहीं ऐकत तूं? बरं आहे, नटेशनें केलेली बळजबरी पापी होती म्हणून साधली नाहीं पण मला कोण आड येतं बघूं (नाटकराव चुंबन घेणार इतक्यांत)

**रमा:**—अगबाई वसंतभाऊजी! (ती दूर होते. वसंतराव व सुशीला हंसत हंसत प्रवेश करतात. नाटक खोटा राग आणून बघतो.)

**नाटकराव:**—त्या वेळीं येऊन माझं हित केलंस, पण या वेळीं येऊन मात्र घात केलास!

**वसंतराव:**—ऐन सुखाच्या समयीं आलों प्रथमचि फसलेंसि मना, उगिच कां अतां हळहळसी? अगदीं गौतमी आत्याबाई सारखा आलों नाहीं रे? नाटकराव ही आपल्या जुन्या शब्दांची फेड बरं का?

**नाटकरावः**—वसंतराव, शेवटीं तुझेच शब्द खरे ठरले. गुलछबूचें मजवर प्रेम किती आहे हें जर मला कळलं असतं तर तुम्हीं अशीं खेटरं खाण्याचा मजवर प्रसंग न येता. आतां घरांत जाऊन त्या हलकट रांडेच्या झिंज्या धरून ढुंगणावर दोन लाथा मारून आधीं बाहेर घालवितों. तसाच तो हरामखोर मोहनराय! मादरचोदानें प्रेमरस प्याल्यावर काय काय ढंग केले नी काय काय कवित्व पाघळलं. मला आपलं त्या वेळीं वाटलं कीं खरंच असेल सारं! हरामजाद्यांना आतां पोलिसांच्या ताब्यांत देतों जाऊन (जाऊं लागतो.)

**वसंतरावः**—अहो झुंजारराव, तसं कांहीं एक करूं नका आणि करण्याची जरुरी नाहीं! कांहीं तरीं निमित्त काढून तुम्ही निसटूं पहाल पण आम्ही जाऊं देणार नाहीं. खरंना ग सुशीले!

**सुशीलाः**—नाटकभाऊजींचें प्रेमाचें वेड नाहींसें झालें पण इकडचं थट्टेचें वेड कधीं नाहींसें होईल तें होवो. वेळ ना वारीं, सदान् कदा मेली थट्टा. चला हो रमाबाई तुम्ही इथून, घालूं द्या यांना इथंच गोंधळ. पुरुषांना काय लाज न लज्जा! (दोघी जातात.)

**नाटकरावः**—वसंता, तुला थट्टा वाटूं देऊं नकोस, पण खुनाचा गुन्हा माफ असता तर मला असा संताप आला आहे या दोघां हरामखोरांचा कीं, सातदां यांचा खून करावा आणि एक मोजावा!

**वसंतरावः**—अहो, सातदां नव्हे सत्तरदां करा त्यांचा खून. मला तेंच बघायचें आहे. तुम्ही त्यांचा खून करतां कीं सत्तरदां त्यांच्या पायां पडतां हाच तमाशा मी बघणार आहें!

**नाटकरावः**—म्हणजे, त्यांनीं माझा घात केला म्हणून मी त्यांच्या सत्तर-वेळां पायां पडणार?

**वसंतरावः**—नाहीं. त्यांनीं तुझं हित केलं म्हणून तूं त्यांच्या सत्तर वेळां पायां पडणार! नाटकराव, मोहनराय आणि गुलछबू यांच्याच कर्तबगारीनें तुझ्या माझ्यावरलें आणि बँकेवरलें संकट टळलें!

**नाटकरावः**—म्हणजे! बँकेची काय भानगड आहे बोवा?

**वसंतरावः**—नटेशनें तुला कांहीं सांगितलें नाहींसें दिसतें! उघडच आहे का सांगेल? नाटकराव, आतां आंत चल, थोडा चहा बिडी घे आणि शांत हो म्हणजे मीं हा सारा इतिहास तुला सांगतों.

**नाटकराव:**—मीं तुला आपला माझ्यासारखा सरळ माणूस समजत होतों. पण तूं मोठा पाताळयंत्री निघालास बोवा! एका संकटांतून सुटून तुझ्या पाताळ यंत्रांत पुन्हां सांपडलों म्हणायचा! भले! बहाद्दर! आपल्या पाताळयंत्रास हा साष्टांग नमस्कार असो! (घालूं लागतो.)

[ पडदा पडतो. ]

---

# अंक ४ था

## प्रवेश ५ वा

[ कोर्टाचा देखावा—वादीप्रतिवादी—चीफजस्टिस—वकील—एक्स्पर्ट-शिपाई वगैरे मंडळी आपल्या जागीं असून डिटेक्टिव्ह मि. दिलावरखां पुराव्याचें भाषण देत उभे आहेत असा पडदा उघडतो. ]

**मि. दिलावर:**—सरसाहेब, मि. मोहनराय आणि गुलछबू यांनीं आतांपर्यंत जी आपली जबानी दिली तींतील त्यांच्या खासगी भागाशीं जरी मला तादृश कर्तव्य नाहीं तरी त्यावरून एवढें निष्पन्न होईल कीं नटेश हा अत्यंत भयंकर माणूस आहे आणि जगांतील शक्य कोटींतील कसल्याही अधमपणाच्या कृत्याला या माणसानें शिल्लक ठेवलेलें नाहीं. त्याच्या पूर्वचरित्राची ही बॅकग्राउन्ड माझ्या या पुढच्या त्याच्या गुन्ह्याच्या पुराव्यास जास्त उठाव देईल यांत बिलकुल शंका नाहीं. नटेशरावांनीं आजपर्यंत किती तरी खोटे चेक केले आहेत याबद्दलचा पुरावा म्हणजे मि. मोहनरायांनीं कोर्टांत सादर केलेलीं हीं हॅन्डप्रेसचीं यंत्रें, खोट्या चेकचे कागद, छापण्यासाठीं हे मुद्दाम तयार केलेले रबरचे ठसे, कागद हवा तितका जुना पुराणा किंवा नवा दिसावा म्हणून त्याला निरनिराळा धूर देऊन रंग आणण्याच्या ह्या पुड्या, शाईच्या निरनिराळ्या प्रकारच्या पुड्या, सारांश, नटेश हा पूर्ण गुन्हेगार आहे हें इतक्या पुराव्यावरून ध्यानांत येईल. आतां या चेकवर सही नटेशरावानें केली आहे किंवा दुसऱ्या कोणीं केली हें सिद्ध करून दाखविण्यास यापुढें फारसा प्रयास पडणार नाहीं. तो चमत्कार मी आपणां सर्वांस आतांच दाखवितों. हा एक कोरा कागद आहे यावर नटेशची सही घेण्याची मी कोर्टाकडून परवानगी घेतों. आतां नटेशराव कोर्टाच्या हुकुमाप्रमाणें या काग-

दावर सही करा. अस्सं. आतां ही बनावट सही आणि ही नटेशरावांनीं केलेली सही ही एकाच माणसाच्या हातची कशी सिद्ध होते इकडे सर्वांनीं लक्ष द्यावें. मजजवळ शेंकडों पट मोठं अक्षर दाखविणारा हा हायक्लास मॅग्निफाइंग ग्लास आहे. कोर्टानें जरा निरीक्षण करायचें होतें ! यांत हुजूरला असं दिसत असेल कीं बनावट सही आणि ही खरी सही तसेंच नटेशरावांनींआतां केलेली आपली सही यांमध्यें अक्षरांच्या रचनेचा बराच भेद आहे. नटेशनं जरी आतां फार संभाळून मला सही केली आहे तरी बँकेंतील त्याच्या हातचे लिहिलेले कागद आणि सह्या ह्या कांहीं त्यांना लपवितां येणार नाहींत. अक्षरांच्या रचनेंत बराच भेद आहे आणि सध्यां हुजूरला त्यांतील वळणांतही बराच भेद आढळून येईल. आतां या यंत्रापेक्षांही सूक्ष्मदर्शक यंत्राच्या सहाय्यानें मी आपणास असें दाखवितों कीं सध्यां दिसणारा रचनेचा भेद आणि वळणाचा भेद हा नुसता भास आहे. या यंत्राच्या सहायानें तो भास नाहींसा होईल. या यंत्राच्या सहायानें मी आपणास असें सिद्ध करून देईन कीं बँकेंतील चेक बुकाचा कागद आणि नटेशनें आपल्या लबाडीसाठीं वापरलेला बनावट चेकचा कागद हे एक नाहींत. त्यांचा नवेजुनेपणा, त्यांतील वाटर मार्कस् या सर्व गोष्टींत भेद आढळून येईल. अर्थात् चेकचा नंबर जुळला आणि सह्या जरी जुळल्या, तरी ज्या अर्थी कागदांत आणि टाइपांत फरक आहे, त्या अर्थी ही बनावट सही हा खोटा कागद जेथें निर्माण झाला असेल तेथें किंवा तेथील इसमांच्या सामिलीनें करण्यांत आली आहे हें सिद्ध होईल. आतां ही सही आणि ही सही एकाच माणसाच्या हातची आहे कीं नाहीं हें खात्रीलायक सिद्ध करण्यास जरी मी असा समर्थ आहें तरी हें काम माझें नाहीं. सरकारी एक्स्पर्ट साहेबांचें हें काम आहे. हुजुरांनीं त्यांना इशारत करावी म्हणजे बराच वेळ खल होत असलेला हा गुन्हा एकदम सिद्ध होईल. ( बसतो. )

[ एक्सपर्ट दोन्ही तिन्ही कागद मायक्रास्कोपच्या यंत्रांचे खालीं घेऊन ४।५ मिनिटें पाहिल्यासारखें करतो. ]

**एक्सपर्टः**—आतां खानबहादुर मि. दिलावरखां साहेबांनीं जीं विधानें केलीं तीं सर्व खरीं आहेत असा मी आपला अभिप्राय देतों. या मायक्रॉस्कोपच्या सहायानें कसल्याही प्रकारच्या बनावट कागदांचा ताबडतोब निकाल करतां येतो. या दोन्ही सह्या ताडून मला असं दिसलें कीं अक्षरांच्या रचनेंत व शाईंत जरी भेद आहे तरी वळणांत म्हणजे अक्षरें काढण्याच्या पद्धतींत बिलकुल भेद नाहीं. आणि हाच सर्वांत मोठा पुरावा होय. कारण, गुन्हेगारानें कितीही सावधगिरी

बाळगिली किंवा कागदासारखा कागद आणि टाइपासारखा टाईप जरी कुशलतेनें वापरला तरी वर्षेच्या वर्षे हातीं बसलेल्या अक्षरांचें वळण त्याला कधींही लपवितां येणार नाहीं. नुसत्या डोळ्यांना सारखेपणाचा भास उत्पन्न करून फसवितां येईल. इतकेंच नव्हे तर या शेंकडोंपट मोठं अक्षर दाखविणाऱ्या यंत्रासही फसवितां येईल; पण मायक्रॉसस्कोप हें अत्यंत सूक्ष्मदर्शक यंत्र आहे. याच्या सहायानें एक बारीक केसाचा तुकडा आपणास लठ्ठ दोरीसारखा दिसेल. म्हणजे पदार्थ हजारोंपट मोठा दिसतो. या यंत्रास फसवितां येणार नाहीं. हें यंत्र निघाल्यापासून बनावट सहीचे गुन्हे पकडण्यास मुळींसुद्धां प्रयास पडत नाहीं. माझ्या आजपर्यंतच्या अनुभवावरून मी सांगू शकतों कीं या यंत्रांत या दोन्ही सह्या एंकाच माणसानें केल्या आहेत असें स्पष्टपणें माझ्या नजरेस पडत आहे आणि मी त्याचा त्रिवार उच्चार करतों. ( खालीं बसतो. )

**कोर्टः**—ज्यूरींतील पंचहो, आपणांस आंत जायचें असल्यास कोर्ट परवानगी देत आहे. ( थोडें खलबत होतें. )

**ज्यूरीः**—आमच्या पुढें आलेल्या जबानी साक्षी आणि एक्स्पर्ट साहेबांनीं दिलेल्या पुराव्याची सप्रयोग माहिती, यांवरून आंत जाण्याची आम्हांस गरज भासत नाहीं. आमचें ऐकमत्य आहे कीं मि० नटेशराव हे बनावट सहीच्या आणि परस्त्रीवर बलात्कार करण्याच्या अपराधांत पूर्णपणें गुन्हेगार आहेत.

**कोर्टः**—नटेशराव, तुम्हांवर बनावट सहीचा आणि परस्त्रीवर बलात्कार करण्याबद्दल असे दोन आरोप शाबित झाले आहेत. याविरुद्ध तुमच्या कडचा पुरावा तुम्ही आणखी कांहीं दाखवूं शकतां काय ? किंवा यावर तुमचें कांहीं म्हणणें आहे काय ?

**नटेशरावः**—माझें कांहीं म्हणणें नाहीं. ज्यांना मी माझे डावे उजवे हात म्हणून आजवर समजत होतों तेच असे बेइमान झाल्यावर मला आतां या प्रकरणीं कांहींच बोलतां येत नाहीं. मोहनराय आणि गुलछबू या दोघां हरामखोरांनीं माझा सर्वस्वीं घात केला आहे. आतां कोर्ट जो निकाल देईल व जी शिक्षा सांगेल ती भोगण्यास मी तयार आहें. ( एकीकडे ) काय करूं ? वसंतयाच्या बायकोचा गुन्हा कोर्टांत मी आणला असता पण या मोहनरायानें त्यांतही माझा घात केला. त्या चांडाळानें तो तिचा दस्तावेज तिला परत नेऊन दिला देखील असेल किंवा देणार असेल. आतां मुख्य पुराव्याच्या अभावीं येथें मी त्या गोष्टीचा उच्चार करणें म्हणजे अब्रू नुकसानीचा तिसरा गुन्हा उभा राहणार आणि वसंतराव मज-

वर दावा करणार ! मोहनराय आणि गुलछबूनें केलेला विश्वासघात पाहून मला असं वाटतं कीं माझ्या डाव्या हातानें मी माझाच गळा धरला आणि उजव्या हातानें सुऱ्यानें माझा मीच गळा कापून घेतला. मोहनरायानें आणि त्या गुलछबूनें आपल्या बेअब्रूचा मजवर माझा सर्व नाश करून पुरता सूड उगविला. त्यांतले त्यांत मला समाधान इतकंच वाटतं आहे कीं वसंत सुशीलेच्या ऐन आनंदाच्या दिवशीं माझा जुना साथीदार तो यम्या रामोशी नेमका सुशीलेच्या अपराधाचा खलिता त्यांच्या हातांत टाकील आणि माझी सुशीलेजवळ केलेली प्रतिज्ञा शेवटीं पूर्ण होईल. त्यांच्या संसाराची जळत असलेली ती होळी मी जवळ हजर राहून पाहाणार होतों; पण या चांडाळांनीं माझा घात केला. कांहीं हरकत नाहीं. आतां तुरुंगांत जरी ही बातमी मला समजली तरी त्या दुर्दशेंतसुद्धां मला आनंदाच्या उकळ्या फुटतील. तो खलिता पेटींत टाकण्याचें काम मोहनला सांगण्याची बुद्धि जर का मला झाली असती तर एवढा मोठा पराक्रमी हा नटेशराव पण एकाद्या हलकट कैद्याप्रमाणें निराशेच्या यातना भोगीत तुरुंगांतच मरण पावला असता. पण आतां मला उमेद आली कीं जन्मठेप काळें पाणी जरी झालें तरी या आनंदाच्या बलावर वीस वर्षें मी जीवंत राहीन आणि सुटून आल्यावर मोहन आणि गुलछबू या जोडीचा समाचार घेतल्यावांचून राहणार नाहीं. मोहनराय आणि गुलछबू, तुम्ही माझ्या हातून अजीबात सुटलां असं समजूं नका. तुमच्यावर सूड घेण्यासाठीं मी हवीं तितकीं वर्षें जीवंत राहीन समजलांत ! याद राखा ! ! (कोर्टाचा जजमेन्ट लिहून तयार होतो आणि कोर्ट वाचून दाखवितें.)

**कोर्टः**—नटेशराव, आमच्यासमोर आलेल्या साक्षीपुराव्यावरून पहातां तुम्हांवर बनावट सही करून बँकेस फसविण्याचा आणि एका श्रीमंत सद्गृहस्थाच्या स्त्रीवर बळजबरी करण्याच्या प्रयत्नाबद्दलचा असे दोन आरोप मुद्देमालानिशीं सिद्ध होत आहेत. तुम्हाला तुमच्या तर्फेचा पुरावा आणण्यासंबंधीं कायद्यानें संधी दिली असतां 'मला आतां कांहीं एक म्हणायचें नाहीं' वगैरे म्हणून तुम्हीही आपला गुन्हा निराळया शब्दांनीं कबूल केला आहे. ज्युरींतील सभ्य गृहस्थही एकमतानें तुम्हाला दोषी ठरवीत आहेत. तुम्ही खासगी रीतीनें गोट्या, मोहनराय, गुलछबू आणि रेवडी या चौघांच्या सहायानें घरीं हॅन्डप्रेस ठेवून चेकच्या मजकुराचे ठसेही तयार करून आजवर अनेक खोटे चेक केले आहेत. गुन्हा नंबर दोनकडे पहातां तुमचें खासगी वर्तन तुमच्या अधिकारास आणि इभ्रतीस भयंकर काळिमा आणणारें आहे. इतकें कीं त्या काळिम्याच्या डाग

सदर्हू गोल्डन बँकेसही शिवल्यावांचून राहिला नाहीं. तुमच्या विश्वासघातकी वर्तनानें साधारण जतनेचा सदर्हू बँकेवरील विश्वास थोडाबहुत डळमळण्याचा बराच संभव आहे. बँकेच्या असिस्टंट मॅनेजरची जागा अत्यंत सन्मानाची पण जबाबदारीची आहे हें तुम्ही लक्षांत न घेऊन पैशाच्या लोभानें आणि आपल्या चांडाळचैनीला आळा बसूं नये म्हणून बँकेसकट एकंदर समाजाशीं निमकहरामपणा केला आहे. मोहनराय आणि गुलछबू यांच्या जबानीवरून समजतें कीं तुम्हीं या अनाथ तरुणांना त्यांच्या असहायपणाचा फायदा घेऊन दुर्वृत्त बनविलें आणि एकंदर समाजाच्या सुरक्षिततेवर धाड घातली. या तुमच्या तिसऱ्या गुन्ह्याचा प्रस्तुत दोन गुन्ह्यांचा पुरावा म्हणूनच उपयोग होण्यासारखा आहे. तथापि असलाही गुन्हा कांहीं कमी भयंकर स्वरूपाचा नाहीं. गोल्डन बँकेचे सध्याचे चीफ मॅनेजर श्रीयुत मि. वसंतराव या अत्यंत थोर, विद्वान् आणि सरकारच्या एकनिष्ठ सेवकाला तुमच्यामुळें अत्यंत त्रास भोगावा लागला याबद्दल सरकारतर्फे कोर्ट अत्यंत दिलगीर आहे. सारांश, श्रीयुत नाटकरावसारख्यांच्या संपत्तीवरील तुमचा अभिलाष, श्रीमती रमाबाईसारख्या सुशील आणि साध्वी स्त्रीची अब्रुनुकसानी, मोहनराय व गुलछबू यांना आडमार्गांत नेणें आणि श्रीयुत वसंतरावासारख्या सभ्य गृहस्थांस तुमच्यापासून झालेला त्रास या सर्व गुन्ह्यांचें स्वरूप पहातां तुमच्यावर दया करणें न्यायासनावर बसणाऱ्याला अगदीं अशक्य आहे. तेव्हां आम्ही सरकारतर्फे आणि न्यायदेवतेचे प्रतिनिधी म्हणून असें जाहीर करतों कीं नटेश, गोव्या या उभयतांना प्रत्येकीं १४ वर्षें सक्त मजुरीची शिक्षा देण्यांत येत आहे. रेवडी ही बाई अगदीं तरुण आहे आणि तिचें प्रत्यक्ष अंग गुन्ह्यांत कमी आहे; सबब कोर्ट तिच्या वयाचा विचार करून तिला दोन वर्षें सक्त मजुरी आणि एक वर्ष साधी अशा ३ वर्षांच्या कैदेची शिक्षा जाहीर करीत आहे. मोहनराय आणि गुलछबू हे सरकारी साक्षीदार होऊन शुद्ध हेतूनें त्यांनीं सरकारास व न्यायास मदत केली, याबद्दल त्यांस सरकार पूर्ण क्षमा करून सोडून देत आहे. श्री. नाटकरावांच्या आणि रमाबाईच्या अब्रुनुकसानीबद्दल आणि श्रीयुत वसंतरावांस झालेल्या त्रासाबद्दल कोर्ट दिलगीर आहे असें पुन्हां म्हणून कोर्ट फैसला जाहीररीतीनें संपवीत आहे. शिरस्तेदार, कैद्यांची योग्य ती व्यवस्था करा. आमची टिफिनची वेळ झाली सबब आम्ही आंत जातों.

( कोर्ट बरखास्त होतें–मंडळी उठून जातात–शिपाई कैद्यांस नेतात. )

---

*

# अंक ५ वा



## प्रवेश १ ला

( वसंत सुशीलेच्या गळ्यांत हात घालून घेऊन येतो. ज्येष्ठा गौरीची आरास )

**वसंतरावः**—परमेश्वराच्या कृपेनें सर्व संकटांचं निवारण झालं. नाटकराव आणि रमा वहिनी यांचा बचाव झाला, बँकेचें काम निर्विघ्न चालू झालं. डायरेक्टरांकडून शाबासकी आली. त्या आनंदांत जणूं भर म्हणूनच कीं काय, आमच्या या चिमणीनेंसुद्धां आपलं चिमुकलं तोंड उघडून केवढा पराक्रम आज गाजविला! माझी बुलबुल आज अशी मधुर स्वर काढीत होती कीं हळदी कुंकवाला जमलेल्या प्रत्येक स्त्रीला ही बाई केवढी विद्वान् म्हणून वाटत होतं आणि आपल्या अंगांत हिच्या सारखे गुण नाहींत म्हणून प्रत्येकानें लक्ष देऊन ऐकण्याच्या निमित्तानें ओशाळगत होऊन खालीं मान घातली होती. आमच्या रमावहिनीला तर असं अगदीं धन्य धन्य होऊन गेलं आहे तुझ्याविषयीं! सुशीले, माझ्या सुखाच्या संसारांतील उद्यानांत माझ्या हृदयकुसुमावर स्वैर आनंदानें बागडणाऱ्या फुलपाखरा, आज मी तुझ्यावर इतका खुश झालों आहें कीं तुला कुठें ठेवूं आणि कुठें नको ठेवूं!

**सुशीलाः**—नाथ, मला अशा ठिकाणीं ठेवा कीं जेथें माझ्याबद्दल संशय, माझ्या गुन्ह्याबद्दल क्रोध यांचं वारंही आपल्या हृदयकुसुमास लागणार नाहीं. त्यांतच तुम्हां आम्हां दोघांनाही सुख आहे. खरंच, नाथ, परमेश्वराच्या कृपेनें आपणा सर्वांवरचीं संकटं निवारण होऊन आज माझ्या जिवास अतोनात समाधान वाटत आहे. माझ्या सूचनेप्रमाणें सर्व बायकांनीं आपापल्या पतीचं मन वळवून मुलींच्या शाळेची योजना फलद्रूप केली तर समाजसेवेचं पुण्य इकडच्या प्रमाणें माझ्याही थोडंसं वांट्याला येईल.

**वसंतरावः**—तुझी सूचना फळास येईल असं मलाही वाटतं. कारण ती सर्वांना अगदीं एकमतानें पसंत पडली आहे. तेव्हां कांहीं तरी फळ दृष्टीस पडणारच त्यांत शंका नको. माझ्या लाडके, जेव्हां तूं भाषण करण्यासाठीं उभी राहिलीस त्या वेळचा देखावा मी कधींही विसरणार नाहीं. तें लाजत लाजत पण आनंदानें उभं राहणं, मोठ्या नखऱ्यानें नमस्कार करून बोलायला आरंभ करणं, बोलतांना होणारा तो अभिमान, बुलबुलाप्रमाणें गोड शब्द काढीत असतांना

होणाऱ्या त्या वांकड्या भुंवया आणि स्मित हास्य करीत असतांना गालांना पड-णारे ते खळगे, याप्रमाणें तुझी एकंदर शोभा पाहून मला असं वाटलं कीं जणु काय प्रमिला राणीच आज आपल्या स्त्री सैनिकांना पुरुषांविरुद्ध उपदेश करीत आहे. तुझ्या हातांतला कागद पाहून तर तूं साक्षात् ब्रह्मकुमारी सरस्वतीच आहेस कीं काय असा मला भास झाला. परमेश्वरा, अशी माझी चिमणी, माझी बुलबुल, माझें फुलपाखरूं, माझी लाडकी सुशीला मला सदैव अशीच लाभूं दे. ( तिला प्रेमानें आलिंगन देतो. )

**सुशीलाः**—आतां गडे पुरें झालं ! मला आला आहे थकवा. मी जाऊन निजतें आतां. आपणही निजावं.

**वसंतरावः**—हो आतां दुसरा काय उद्योग तुम्हाला आणि मला ! जावं खुशाल निजावं आपण. आम्हीही आजचीं पत्रें बघून येतों ! उद्यां सकाळीं नाट-कराव आपल्या नाटकी पद्धतीनें आपणांस टी-पार्टी देणार आहे. तेव्हां तेवढं लक्षांत असूं द्या ! सुशीले नाटकरावाच्या प्रसंगावरून मलाही असं वाटतं—आपलं थट्टेनं हो—कीं तुझ्यावर कांहीं तरी फार संकट यावें आणि त्यावेळीं मी मोठ्या हुशारीनें आणि धैर्यानें त्या संकटास तोंड देऊन तुझ्यावरील माझ्या उत्कट प्रेमाची साक्ष प्रत्यक्ष पटवून घ्यावी !

**सुशीलाः**—एकाचं नाटक जिरलं आणि दुसऱ्याचं आतां वर डोकं करायला लागलं बरं का ! ( तो तिच्या गालावर चापटी मारून जातो. सुशीला पलंगावर जाऊन निजते—इतक्यांत वसंतराव क्रुद्ध होऊन परत बाहेर येतो व तीस हांक मारतो. )

**वसंतरावः**—( हातांत उघडें पत्र आहे ) सुशीले, बाहेर ये !

**सुशीलाः**—काय झालं ! इतक्यांत डोळा लागतच होता !

**वसंतरावः**—काय झालं ! घात झाला ! तूं माझा घात केलास.

**सुशीलाः**—मीं घात केला ? कांहीं नाटकाची लहर आली आहे वाटतं ?

**वसंतरावः**—सुशीले, थट्टा नाहीं ही ! हें पत्र कोणाकडून आलं आहे तुला ठाऊक आहे का ?

**सुशीलाः**—नाहीं बाई ! आज सारीं दोन पत्रं आलीं आहेत, म्हणून विठ्या सांगत होता, पण मीं कांहीं बघितलीं नाहींत !

**वसंतरावः**—नटेशनं हें पत्र मला कांहीं दिवसांपूर्वी लिहून ठेवलेलें आहे. तें आतां इतक्यांत एका रामोशानें मला आणून दिलें. त्याला विचारतां तो म्हणाला

मला नटेशचाच असा हुकूम होता कीं तुमच्या येथें ज्येष्ठा गौरीचं हळदी कुंकुं अमूक दिवशीं होणार त्या दिवशीं हें पत्र रात्रीं मी तुमच्या हातांत द्यावं. तो पुढें आणखी म्हणत होता कीं नटेशनं त्याला या पत्रांतील मजकूर सांगितला आहे! सुशीले, या पत्रांत काय लिहिलं आहे त्याची तुला कल्पना आहे काय? तूं माझा विश्वासघात केलास!

**सुशीला:**—आलं माझ्या लक्षांत! नटेशनं शेवटीं असा सूड उगविला! नाथ, माझं मन मी आज इतकीं वर्षं कठोर करण्याचा प्रयत्न करीत होतें पण तें झालें नाहीं. सांगा काय लिहिलं आहे तें, सांगा मला. मी भोगायला तयार आहें!

**वसंतराव:**—हर! हर! सुशीले! हेंच का तुझें मजवरचें प्रेम! ज्या अपराधाबद्दल नुकतीच नटेशला तुरुंगांत सात वर्षें खडी फोडण्याची शिक्षा मिळाली तोच अपराध माझ्या बायकोनें करावा अं! सुशीले हेंच का तुझें मजवरचें प्रेम?

**सुशीला:**—होय नाथ, मीं जें कांहीं केलें आहे तें प्रेममूलकच आहे. त्याचा हेतु अत्यंत शुद्ध आहे!!

**वसंतराव:**—सुशीले, आतां बतावणी करूं नकोस!

**सुशीला:**—( जवळ जाते. ) नाथ! ( तो झिडकारतो. )

**वसंतराव:**—चांडाळणी, तुझा स्पर्श सुद्धां नको मला! बनावट सहीसाठीं मी आजवर नटेशविरुद्ध एवढी हाकाटी केली आणि आज तीन वर्षें तोच गुन्हा तूं मजपासून चोरून ठेवलास!

**सुशीला:**—हाय! हाय! दुर्दैवा! शेवटीं तुला आमचं सुख नाहीं सहन झालं म्हणून येऊं नये तो प्रसंग आणलास! बरं जशी तुझी इच्छा! ( उघड ) नाथ, माझ्या अपराधाबद्दल तुम्हाला त्रास मी होऊं देणार नाहीं. आपण तें आपल्या अंगाशीं मुळींच लावून घेऊं नये.

**वसंतराव:**—उगीच चावटपणानें बटबट करूं नकोस! माझ्या प्रश्नाचीं योग्य उत्तरें दे. तूं बनावट सही केलीस म्हणजे केवढें घोर पातक केलें आहेस आणि याचा परिणाम काय होणार याची तुला कांहीं कल्पना आहे काय?

**सुशीला:**—होय, हळू हळू मला कळत चाललं आहे याचा काय परिणाम होणार आहे तो!

**वसंतराव:**—हाय हाय! आज किती दिवसांत माझे डोळे उघडले आणि उघडले तेही इतक्या भयंकर रीतीनें कीं ते कायमचे पुन्हा मिटल्याखेरीज त्याची भीति नाहींशी होणार नाहीं. जिला मी आपला आनंद, आपला प्राण

समजत होतों, जिच्या सद्गुणांचा मला अत्यंत अभिमान ती एक खोटं बोलणारी दगलबाज स्त्री आहे, भयंकर गुन्हेगार आहे! हाय, हाय! सुशीले, तुझ्या सुंदर चेहऱ्याकडे पाहिलें तर असली अमंगळ कल्पना सुद्धां करवत नाहीं. धिक्कार असो तुला! मला हें पूर्वींच कळलं असतं, तूं मला पूर्वींच कळविलं असतंस—पण हें मी काय म्हणतों आहें. गुन्हेगार आपले गुन्हे पूर्वींच कसे कळवितील? सुशीले, तुझा बाप असाच होता? ना धर्म ना नीति ना कर्तव्याची जाणीव! कांहींच त्याला नव्हतें. तेंच तुझ्या स्वभावांत उतरलं आहे हें मला पूर्वींच कां समजूं नये? आतां मला पश्चाताप होतो आहे कीं मीं उगाच त्यावेळीं तुझ्या बापासाठीं खटपट केली. सुशीले, सुंदर चेहऱ्याच्या राक्षसी, केवळ तुझ्या प्रेमासाठीं मी त्यास सोडविलें आणि त्याबद्दल आज इतक्या वर्षांनीं मला असें बक्षिस देते आहेस?

**सुशीलाः**—होय, ही फेडच आहे पण तुम्ही म्हणतां त्या अर्थानें नव्हे! मी जें केलें आहे तें शुद्ध हेतूनें केलें आहे!

**वसंतरावः**—माझ्या सर्वस्वाचा नाश हाच तुझा शुद्ध हेतू ना? तुझ्या ह्या शुद्ध हेतूनें माझें कोणतें कल्याण झालें आहे? उलट मी अशा एका माणसाच्या पकडींत सांपडलों आहें कीं या तुझ्या शुद्ध हेतूचा—वा रे शुद्ध हेतू! तुझ्या या गुन्ह्याचा फायदा घेऊन त्यानें मजजवळ वाटेल तें मागावें आणि तें मीं दिलेंच पाहिजे! त्यानें हवें तें मला सांगावें आणि मीं तें केलेंच पाहिजे. एका मूर्ख बायकोच्या अपराधासाठीं मीं आतां यापुढें एका हलकट रामोशाच्या हातचें बाहुलें होऊन बसावें ना? दुर्दैवा काय केलेंस हें!

**सुशीलाः**—रामोशी? कुठला रामोशी?

**वसंतरावः**—मघां सांगितलेला रामोशी, त्याला नटेशनें या पत्राचा मजकूर सांगितला आहे. तो त्यांचा साथीदार होता. तो मघांच मला सांगून गेला कीं तुमचें रहस्य मला ठाऊक आहे, तेव्हां आतां जन्मभर तुम्ही माझे ताब्यांत आहांत म्हणून!

**सुशीलाः**—माझ्याकरतां आपण त्रास भोगूं नये. मी भोगूं देणार नाहीं. आपल्या वाटेंतील माझा कांटा नाहींसा झाला म्हणजे आपण मोकळेच आहांत! मी पुनः सांगतें कीं मीं जें केलें तें योग्य केलें. हें रहस्य मीं आपणास पूर्वींच सांगितलें असतें, तर जो घात झाला असता त्या मानानें यापुढें होणारा घात कांहींच नाहीं. नाथ, तुमच्या आणि माझ्या हितासाठींच हें मीं गुप्त राखिलें!

**वसंतरावः**—कांहीं तरी बोलून सुटका होत नसते! माझ्या वाटेंतला तुझा कांटा आतां निघायचाच असेल तर एक मृत्यूच तो काढील! सुशीले, आजन्म एकमेकांच्या वाटेंत कांटा होऊन पडण्याची विवाहसमयीं देवब्राह्मणांसमक्ष आपण शपथ घेतली आहे. आतां मृत्यूनें मला तरी नेलें पाहिजे किंवा तुला तरी नेलें पाहिजे. एरवीं हे कांटे दूर होणार नाहींत! आणि सुशीले, माझ्या वाटेंतून अशा रीतीनें जरी दूर झालीस तरी माझा बचाव कुठें झाला त्यांत? तो रामोशी हें रहस्य चहूंकडे पसरील आणि तसें झालें तर बायकोनें केलेल्या असल्या गुन्ह्यांत नवरा सामील असलाच पाहिजे असा लोक सहजच तर्क करतील. इतकंच नव्हे तर मीच तो गुन्हा पैशासाठीं तुजकडून करविला असेंच सारे म्हणायला लागतील. हेच आपले मजवर उपकार ना? तुमचं माझं हेंच हित तूं पाहिलेंस ना?

**सुशीलाः**—होय, नाथ, हितच पाहिलं आहे; पण तें आपल्या लक्षांत येत नाहीं, याचें कारण मलाही आज इतक्या वर्षांनंतर–लग्न झाल्यापासून इतक्या वर्षांनंतर आज मला कळतं आहे, इतकंच काय तें!

**वसंतरावः**—सुशीले, तुझ्या या सुंदर ओठांत मी सत्याचं अमृत भरलेलं समजत होतों. या सुंदर चेहऱ्यांत मला निष्कपटाचाच भास होत असे. या तेजस्वी डोळ्यांत प्रेमाचीच झांक मारीत असेलसें मला वाटे. हें सरळ नाक तुझं वर्तन आणि मन मला सरळ दाखवीत असे. पण हें सारं मृगजलवत् ठरलं. आज इतकीं वर्षें मी एका मायावी राक्षसिणीशीं संसार केला असंच मला आतां वाटूं लागलं आहे. समाजाच्या निर्बंधांनीं आणि शिष्टाचाराच्या नियमांनीं जखडलेलीं तुमचीं आमचीं मनं आणि शरीरं व्यवहारांत दूर राहणें अशक्य आहेत, तेव्हां तूं माझ्या घरांत रहा. पण मजवरची तुझी सत्ता गेली, आणि त्याबरोबर तुझ्या माझ्या दोघांच्याही संसाराची राख रांगोळी झाली हें मात्र खरं! तुझा माझा व्यवहार अनेक बाबतींत पूर्वीप्रमाणेंच चालेल. आपणांमध्यें वितुष्ट आलें आहे अशी शंका लोकांना न यावी असेंच वर्तन ठेवायचें आहे. पण अंतर्यामीं हें खास समज कीं मला तूं मेली आहेस, आणि तुला मी मेलों आहें. हाय, हाय! सुशीले, काय हा प्रसंग! माझ्या चिमणीला, माझ्या फुलपांखराला असले अमंगळ शब्द मीं ऐकवावे ना? सुशीले, तुला ही बुद्धी कां झाली? ( बाहेर पाहून ) इतक्या रात्रीं कोण आलं आहे हें? अरे हा नाटकरावाचा शब्द! मोहनरायही वाट-

तात आलेसे ! ( नाटक, गुल मोहन. व रमा येतात. मोहन एक कागद पुढें करतो ).

**मोहनराव**:—वसंतरावसाहेब, आपण अगदीं काळजी करूं नका. हा तो दस्तावेज घ्या आणि साऱ्या त्रासांतून मोकळे व्हा ! इतक्यांत विठ्या आला आणि 'आज धनीसाबांचं आणि बाईसाबांचं कांहीं तरी मोठें बिनसलें आहे व धनीसाब बाईसाबांना अतिशय रागें भरत आहेत' म्हणाला. मला ताबडतोब कल्पना आली कीं हें दस्तावेजाचें प्रकरण असावें. मी त्या काळजींतच होतों; पण माझा कांहींच उपाय चालेना. हा कागद मला गुलछबूच्या तिजोरींत सांपडला. आधीं सांपडला असता तर हा प्रसंग येतांना. विठ्याचा निरोप ऐकून आम्ही सारे घाबरलों आणि मी हा कागद घेऊन तसाच निघून आलों. वसंतरावसाहेब, सुशीलाबाई शुद्ध आहेत. त्यांना तुम्ही क्षमा करा ! तुमचे प्राण वांचावे म्हणूनच त्यांनीं हें भयंकर धाडस केलं. त्या वेळची परिस्थिती ध्यानांत आणा, आणि मग सुशीलाबाईंना दोष द्या. पातिव्रत्याचा असा अपमान करूं नका. पतिदेवाचे प्राण वांचविण्यासाठीं केलेलें कोणतंही पातक 'पातक' या सदरांत येणार नाहीं. आम्हांला रमाबाईंनीं सारा इतिहास सांगितला आणि म्हणून तुमच्या बचावाची तजवीज आम्ही शोधीतच होतों; पण दुर्दैवानें त्या आधींच हा अनर्थ कोसळला. रावसाहेब, मी प्रसिद्ध गुन्हेगार आहें हें आपणास ठाऊकच आहे. आज मी आणखी एक गुन्हा करणार होतों. तो हाच कीं नटेशच्या डावाप्रमाणें हें पत्र घेऊन येणाऱ्या माणसावर पाळत राखून तो या घरांत शिरल्याबरोबर त्याच्यावर हल्ला करून तें पत्र लांबवावयाचें. पण आमचं थोडक्यांत चुकलें ! हा कागद शोधण्याच्या गडबडींत वेळाचें भान राहिलें नाहीं आणि तो माणूस निघून गेला. रावसाहेब त्या इसमानें आपलें नांव सांगितलें का ?

**वसंतराव**:—नाहीं. तो एक रामोशी आहे एवढं मला कळलं.

**मोहन**:—आलं लक्षांत, गोदुताई तोच तो हरामखोर यम्या बरं का ? ध्यानांत आलाना तुझ्या ? अस्तु. रावसाहेब, तुम्ही दोघें आतां स्वस्थ व्हा. त्याला मी लवकरच पकडून पोलिसच्या ताब्यांत देतों. ह्या कागदाचाही नाश करून टाकतों ( जाळतो. ) म्हणजे तुम्हाला मग कसलाच त्रास होणार नाहीं. एका बनावट सहीनें नटेशाचा घात केला तो योग्य झाला. पण दुसऱ्या बनावट सहीनें सुशीलाबाईसारख्या पुण्य गंगेला आटवून टाकण्याचा घाट घातला होता. आतां तें

मी होऊं देणार नाहीं. बरं आहे, आम्ही जातों आतां. नमस्कार. चला नाटकराव, ताई, चला. ( जातात. )

**रमा:**—भाऊजी, बाईंची समजूत घाला बरं का ? त्यांची योग्यता फार मोठी आहे ! त्यांना दुखवूं नका !

**वसंतराव:**—तें आतां मजकडे लागलं. बायको रागावली तर नवऱ्याला तिला लगेच खुश करतां येते. तुम्ही स्वस्थ जा ! ( गेल्यावर थोडा थांबून ) लाडके, मी अत्यंत कठोरपणानें आतां जें बोललों त्याबद्दल मला आतां फार वाईट वाटत आहे. बनावट सहीचं नांव ऐकल्याबरोबर मजपुढें असंख्य भेसुर चित्रें उभीं राहिलीं आणि बावरलेल्या मनाच्या त्या स्थितींत मी तुला नाहीं नाहीं तें बोललों; परंतु आतां माझ्या नीटपणें लक्षांत आलं कीं मजवरील तुझ्या उत्कट प्रेमामुळेंच तुझ्या हातून हें कृत्य घडलं !

**सुशीला:**—हें मीं आपणास आधींच सांगितलं !

**वसंतराव:**—होय सांगितलं खरं ! स्त्रीची पतीवर जितकी निष्ठा व प्रेम असायला पाहिजे तितकें तुझें होतें, तुझ्या हातून चूक झाली ती एवढीच कीं माझ्या आरोग्याप्रीत्यर्थ तूं पैसे उभे केलेस त्यासाठीं साधनाची निवड मात्र दोषास्पद झाली. पण ही चूक तूं मुद्दाम केली नाहींस. अबलांचें मन आधींच कमकुवत त्यांत चहूंकडून संकटांनीं घेरल्यामुळें कसं तरी करून संकट टाळावें अशी स्थिति होऊन तुझ्या हातून साधनाची निवड बरोबर झाली नाहीं, यांत कांहीं विशेष नाहीं. पण स्वतांच्या जबाबदारीवर संकटसमयीं कसें वागावें हें तुला समजलें नाहीं म्हणून तूं मला कमी आवडती आहेस असं समजूं नकोस ! स्त्रियांचें अबलापणच पुरुषांची त्यांच्याविषयींची आवड दुप्पट करीत असतें. सुशीले, आतां पहिलं कांहीं मनांत आणूं नकोस. मी खुल्या अंतःकरणानें तुला क्षमा करतों ! आतां निर्घोर नीज !

**सुशीला:**—मला आतां निजायचं नाहीं. माझी झोंप आतां सदांची नाहींशी झाली आहे ! आपणही बसावं. मला आज आपणाशीं बरेंच बोलायचं आहे !

**वसंतराव:**—सुशीले इतक्या चमत्कारिक मुद्रेनें मजकडे कां बघते आहेस ? मला तुझ्या शब्दांचा अर्थ नीट कळला नाहीं ! माझं मन भिऊं लागलं आहे.

**सुशीला:**—आपलं म्हणणं बरोबर आहे. माझ्या शब्दांचा जसा अर्थ आपणास कळला नाहीं तसा आपल्या शब्दांचाही अर्थ माझ्या लक्षांत आजवर—या घटकेपूर्वीपर्यंत कळला नव्हता ! आपल्या लग्नाला आज आठ वर्षें झालीं. या

आठ वर्षांत आपण एक दिवस तरी एकमेकांच्या वस्तुस्थितीबद्दल विचार करीत बसलों होतों का ? आपणास आठवतं असं ?

**वसंतराव**:—वस्तुस्थिती ? कसली वस्तुस्थिती घेऊन बसली आहेस सुशीले ! शांत हो आतां !

**सुशीला**:—आपणास वस्तुस्थितीची म्हणजे एकमेकांच्या खऱ्या मनस्थितीची आजवर कधींच किंमत वाटली नाहीं. आणि माझें मन कसल्या प्रकारचें आहे त्याचा आपण कधींच विचार केला नाहीं. आपण आणि बाबांनीं दोघांनीं मिळून माझं भयंकर नुकसान केलं आहे !

**वसंतराव**:—मी आणि बाबांनीं ! तुझं नुकसान !! सुशीले, काय बोलते आहेस तूं ? ज्या मी आणि तुझ्या बाबांनीं या जगांतील सर्वांच्या पेक्षां जास्त तुजवर प्रेम केलं, त्या आम्ही दोघांनीं तुझं नुकसान केलें ? सुशीले, तूं शुद्धीवर बोलते आहेस का ?

**सुशीला**:—आजच्या इतकी शुद्धींत मी आजवर कधींच बोललें नाहीं. आपलें प्रेम मजवर कधींही नव्हतें. खऱ्यां प्रेमाची नक्कल करण्यांत आपणांस सुख वाटलं इतकंच !—आपला स्वभाव कोंवळा व रंगेल आहे म्हणून आपण मला कठोरपणानें किंवा तिरसटपणानें वागविलें नाहीं हें खरं, पण म्हणून आपण मजवर प्रेम केलं हा त्याचा अर्थ होत नाहीं. कारण प्रेमाला कसलाही स्वभाव चालतो आणि प्रेमाचा विषय कसलीही व्यक्ति होऊं शकते !

**वसंतराव**:—काय चमत्कारिक विधान हें !

**सुशीला**:—चमत्कारिक विधान नव्हे, ही वस्तुस्थिति आहे ! मी माहेरीं बाबांजवळ असतांना ते निरनिराळ्या विषयांवर आपले अभिप्राय देत असत आणि साहाजिकपणें मला तेच खरे वाटत असत. पण जे कांहीं थोडे मला पटत नव्हते ते मी त्यांना कधीं बोलून दाखविले नाहींत. ते मला लहानपणीं आपली करमणुकीची बाहुली समजत आणि मी आपल्या बाहुल्यांशीं खेळें तसेच ते मजबरोबर हंसत खेळत वागत असत. माझं लग्न झाल्यावर मी आपल्या घरांत आलें. पण माझ्या बाहुलीपणांत कोठें फरक झाला ? माझें फक्त स्थानांतर झालें. लग्न होईपर्यंत मीं बाबांची बाहुली होतें. लग्नानंतर आपली झालें, इतकंच ! आपल्या ज्या आवडीनिवडी, आपलीं जीं मतं तींच माझीं झालीं. निदान अनेक बाबतींत तरी तशीं मला दाखवावीं लागलीं. गेल्या आयुष्याचा विचार करतां बाबांच्या घरीं काय किंवा आपल्या घरीं काय घातल्या अन्नाची व दिल्या

वस्त्रांची अशी मी एक प्राणी होतें. बाबांच्या किंवा आपल्या घरांतील मालकीच्या टेबल, खुर्च्या, पेट्या पैकींच मी एक होतें. कोपऱ्यांत मांडलेल्या खुर्चीनें ज्याप्रमाणें कोंपऱ्यांत राहिलेंच पाहिजे तसें मलाही वागविण्यांत आलें. म्हणून म्हणतें आपण आणि बाबांनीं मला तसं आपल्या लहरीप्रमाणें वागविण्यांत मोठं पाप केलं आहे. तुमच्या दोघांच्यामुळेंच माझ्या आयुष्याचें सार्थक करायला मी शिकूं शकलें नाहीं !

**वसंतरावः**—सुशीले, काय कृतघ्नपणाच्या आणि अविचाराच्या गोष्टी सांगते आहेस ! तुला माझ्या घरांत सुख लागलें नाहीं ? तूं येथें सुखी नव्हतीस ?

**सुशीलाः**—नाहीं, बिलकुल नाहीं. मला केवळ सुखाचा भास मात्र झाला. नाथ, मला या घरांत सुख बिलकुल लागलें नाहीं. मी फक्त चैनींत मात्र राहिलें ! चैन आणि सुख यांत फार अंतर आहे. आपण मला फार ममतेनें वागविलें खरें, पण आपलें घर म्हणजे निवळ खेळण्याचें घरकुलच झालें नाहीं का ? माहेरीं बाबांची जशी कन्या या नात्यानें मी बाहुली होतें, तशी आपलेकडे आल्यावर मी आपली पत्नी या नात्यानें बाहुलीच नाहीं का झालें ? आईबापांनीं ममतेनें वागविलें खेळविलें म्हणजे जशी मुलांना गंमत वाटते, आनंद होतो तद्वतच आपण प्रेमानें वागवीत असतांना, माझ्याशीं थट्टा मस्करी करीत असतांना मला गंमत वाटत असे, आनंद वाटत असे ! नाथ, जरा विचार करून मला सांगा कीं लग्नाचा यापेक्षां गंभीर आणि व्यापक अर्थ आपण कधीं केला होता का ?

**वसंतरावः**—सुशिले, तुझ्या म्हणण्यांत तथ्य आहे हें मला कबूल केलेंच पाहिजे ! तरी पण मला असंही वाटतं कीं हे तुझे विचार अंमळ अतिशयोक्तीचे आहेत.

**सुशीलाः**—अतिशयोक्ति मी केली नाहीं. प्रत्येक स्त्री आपल्या संसाराकडे लक्ष देईल आणि विचार करील तर तिची स्थिति मी म्हटल्याप्रमाणेंच तिला दिसेल. नाथ, या आत्मनिरीक्षणाचें शिक्षण आपण मला देण्यास असमर्थ आहांत. हें निरीक्षण माझें मींच केलें पाहिजे. नाथ, मीं आपली पत्नी होण्यास नालायक आहें. यापुढचा संसार करण्यासही मी त्यामुळें नालायक झालें आहें. मला माझी जबादारी जोंवर कळली नाहीं तोंवर मी संसार कशी करणार ? आपण मागें एकदां म्हटलें होतें कीं गुन्हेगार आईची संगत लहान मुलांस लागल्यास तीं गुन्हेगारच निपजतात. नाथ, सृष्टिक्रमाप्रमाणें मजवर मातृत्वाची जबाबदारी आल्यावर माझ्या अर्भकांना योग्य शिक्षण देण्यास मी आपल्या मतें नालायक ठरेन. होय,

आपलें मत बरोबर आहे, नाथ, खरोखरच मी नालायक ठरेन. कारण आत्मशिक्षण झाल्याशिवाय शिशुशिक्षणास हात घालणारी स्त्री केव्हांही नालायक ठरेल. सारांश माझ्यापुढें सध्यां आत्मशिक्षणाचाच मोठा प्रश्न आहे व तो साध्य होण्यासाठीं मला हें घर कायमचें सोडलें पाहिजे.

**वसंतराव**:—(अत्यंत घाबरून) काय म्हणतेस सुशीले ! तूं मला सोडून जाणार काय ?

**सुशीला**:—होय. नाथ, मोठ्या दुःखानें मला म्हणावें लागतें आहे कीं, मी आपणास सोडून जाणार ! आत्मनिरीक्षण जर करायचं असेल, आपण कोण आणि आपली जबाबदारी काय हें जर ओळखायचें असेल, तर माणसानें एकांत-वासच पत्करला पाहिजे !

**वसंतराव**:—भलतेंच कांहीं तरी ! सुशीले, तूं शुद्धीवर नाहींस ! तुझं डोकं फिरलं आहे ! मी तुला तसं करूं देणार नाहीं. साफ सांगतों कीं मी तुला जाऊं देणार नाहीं !

**सुशीला**:—आतां मला साफ सांगण्यांत कांहीं जीव राहिला नाहीं. माझं लुगडें चोळी जें काय जरुरीचें साहित्य बाबांनीं म्हणून मला दिलं आहे तेवढं घेऊन मी चालती होणार. आपल्याजवळची कपर्दिकाही मला नको आहे. मी येथून गेल्यानंतर आपणांस मजसाठीं एक पैही खर्च येणार नाहीं. मी यापुढें आपणाजवळ कांहींही मागणार नाहीं !

**वसंतराव**:—सुशीले, काय हा वेडेपणा, उगाच तूं आपल्या डोक्यांत राख घालते आहेस.

**सुशीला**:—माझ्या आशेवर, माझ्या महत्वाकांक्षेवर, माझ्या सर्व सुखमय संसारावर राख पडली आहे, तेव्हां माझ्या डोक्यांत शिरायची कां राहील ? उद्यां मी आपल्या माहेरच्या घराकडे जाईन आणि त्या गांवीं कांहीं तरी करून मी आपलें पोट भरीन.

**वसंतराव**:—वेडानें तुझी दृष्टि अंध झाली आहे ! सुशीले हा शुद्ध वेडे-पणा आहे !

**सुशीला**:—शहाणपणा शिकण्यासाठींच मी घरदार सोडतें आहें.

**वसंतराव**:—आपला संसार सोडून, आपला नवरा सोडून, आपलें घर सोडून तूं जाते आहेस. लोक काय म्हणतील याचा तूं कांहीं विचार केला आहेस का ?

**सुशीलाः**—लोकापवादाची लाज मला उरली नाहीं. नाथ, लोकापवादाची लाज व्यर्थ धरल्यामुळें आजपर्यंत अनेक स्त्रीपुरुष आपल्या कर्तव्याला मुकले आहेत. जग कोणाला चांगलें म्हणत नाहीं. वेडे लोक उगाच लोकापवादाची पर्वा धरून आपल्या श्रेष्ठतम कर्तव्याकडे दुर्लक्ष करतात आणि शेवटीं दोहोंसही मुकतात ! लोक काय बोलतील या क्षुद्र गोष्टीकडे लक्ष देण्यापेक्षां संसाराचा संन्यास मी करतें आहें हें माझ्या आत्मजागृतीसाठीं आवश्यक आहे किंवा नाहीं हेंच मीं पाहिलें पाहिजे !

**वसंतरावः**—अशा रीतीनें नवऱ्याचा आणि घरादाराचा त्याग करून तूं आपल्या आवश्यक आणि पवित्र कर्तव्यापासून मात्र पराङ्मुख होते आहेस !

**सुशीलाः**—माझीं अशीं कोणतीं पवित्र कर्तव्यें आपण आहेत म्हणून समजतां आहांत ?

**वसंतरावः**—तें तुला मीं सांगावें काय ? आपल्या पतिदेवासंबंधींचें कर्तव्य तुला कळत नाहीं काय ?

**सुशीलाः**—या कर्तव्यापेक्षांही उच्चतर कर्तव्य माझ्यापुढें आहे !

**वसंतरावः**—अशक्य आहे ! पतिनिष्ठेपलीकडे स्त्रियांना दुसरें कर्तव्य शिल्लक राहातच नाहीं ! सांग बरं कसलं तें ?

**सुशीलाः**—पतिनिष्ठेपेक्षां आत्मनिष्ठा आपणांस श्रेष्ठ वाटत नाहीं काय ? या आपमतलबी जगाच्या संसारांत असंख्य आपमतलबी जोडपीं वावरत आहेत. ऐहिक समाधान हाच त्यांचा मोक्ष आणि ऐहिक संतर्पण हाच त्यांचा श्रेष्ठ धर्म होऊन बसतो. पतिनिष्ठा, मातृपितृनिष्ठा या सर्व कर्तव्यांपेक्षां आपल्या आत्म्यासंबंधींचें कर्तव्य मी जास्त श्रेष्ठ समजतें !

**वसंतरावः**—तें तूं कांहीं जरी म्हटलेंस तरी मला आपलं वाटतें कीं तूं आपला पत्नीपदाचा धर्मच आधीं पाळला पाहिजे !

**सुशीलाः**—आतां मला या अपूर्ण आणि रूढि–धर्मावर विश्वास ठेवावासा वाटत नाहीं. मीं पत्नी असेन पण मला एवढें कळतें आहे कीं विचार करण्यास समर्थ अशी मी एक आपल्याप्रमाणेंच मानवी प्राणी आहें. आणि तशी नसलें तर मला झालें पाहिजे हें मात्र खास ! नाथ, जग आपणासच खरें लेखील व मला अविचारी म्हणेल, मूर्ख म्हणेल, माथेफिरू म्हणेल, हें मला सगळें कळतें आहे. कारण पतीचा त्याग करणाऱ्या स्त्रीला पतिव्रता असें कोणी म्हणणार नाहीं. पतिव्रतेचा धर्म आमच्या धर्मशास्त्राच्या आणि नीतिशास्त्राच्या ग्रंथांमधून पुष्कळ गायलेला आहे

आणि त्याही दृष्टीनें मी दोषीच ठरणार आहें. पण आपण हें लक्षांत ठेवावें कीं प्रसिद्ध तत्वज्ञानी महर्षी याज्ञवल्क्याच्या म्हणण्याप्रमाणें आत्मनिरीक्षण हें सर्वांत महत्वाचें कर्तव्य आहे आणि त्यासाठीं लोक काय काय म्हणतील किंवा आमच्या धर्मपुस्तकांतून काय काय सांगितलें आहे याचा विचार मी गौण समजतें. हें जग आणि माझी मी मला स्वतःच्या प्रयत्नानें आणि अनुभवानेंच जाणतां आलीं पाहिजेत !

**वसंतरावः**—माझ्या घरांत तुझं स्थान कोठें आहे आणि त्याची जबाबदारी काय याचा विचार तुला कर्तव्य नाहीं तर तुला धर्मच नाहीं असं मला वाटतं !

**सुशीलाः**—मला धर्म म्हणजे काय हें नीटसें कळलेंच नाहीं आणि तें कळावें म्हणूनच मी संसारत्याग करतें आहें !

**वसंतरावः**—कांहींतरी बोलते आहेस झालं !

**सुशीलाः**—बाबांनीं, आईनें आणि शाळेंतील शिक्षकांनीं जें काय मला सांगितलं किंवा इतर बुकांत जें काय लिहिलं आहे तेवढीच मला धर्मसंबंधीं माहिती आहे. पण आतां जेव्हां मी आपणापासून चालती होईन तेव्हां धर्म तत्व ही काय चीज आहे, जन संतर्पण हाच खरा धर्म आहे किंवा आत्मतर्पण हा खरा धर्म आहे, याचाच मी स्वानुभवानें, स्वनिरीक्षणानें व स्वविचारबुद्धीनें उलगडा करणार आहें !

**वसंतरावः**—तुझ्या वयाच्या तरुणीच्या मनांत हे विचार म्हणजे खरोखर कल्पनातीत आहेत. असे विचार कोणाही स्त्रीच्या मनांत येत नाहींत. तुझें मन इतकें नाजूक आहे, इतकें अभिमानी आहे, तूं प्रत्येक गोष्टीला इतकें महत्व देतेस हें जर मला अगोदर कळतें, तर मी फारच जपून तुझ्याशीं वागलों असतों. तुझे विचार इतके सूक्ष्म असतील अशी मला कल्पनाही नव्हती !

**सुशीलाः**—मी तेंच म्हणतें. आपलें दोघांचें लग्न झालें, पण एकमेकांच्या स्वभावाचें पृथक्करण आपणांस कधीं झालें नाहीं. एकमेकांची मनस्थिति समजून घेण्याचा प्रयत्नही आपण केला नाहीं. नाथ,—जगांतील प्रत्येक स्त्रीपुरुषानें हा विचार केला तर विजोड लग्नें होणार नाहींत आणि झाल्यास तीं तडजोडीनें पण खऱ्या सुखानें नांदतील ! पण जेथें स्त्री किंवा पुरुष एकमेकांच्या सत्तेच्या उपभोग्य वस्तु आहेत आणि हा प्रवृत्तीचा उपभोग घेणें म्हणजेच संसार ही जेथें भावना आहे, तेथें कसला धर्म आणि कसलें कर्तव्य आलें आहे ?

**वसंतराव:**—बरं, धर्मावर तुझा विश्वास नाहीं तर मी तुला विचारतों सद-सद्विवेकबुद्धी आहे कीं नाहीं? ती तुला असं करण्यास परवानगी देते आहे काय?

**सुशीला:**—या प्रश्नाचें उत्तर देणें कठीण आहे. सदसद्विवेकबुद्धि म्हणजे काय? ती कृत्रिम आहे अथवा स्वाभाविक आहे? ती मला असं सांगते किंवा दुसरें कांहीं मला तशी आज्ञा करीत आहे, हें सांगणें कठीण आहे. आपला आणि माझा दृष्टिकेंद्र निराळा आहे एवढें मी सांगू शकतें. खरा धर्म कांहींतरी निराळी वस्तु आहे असं मला वाटतं आणि तोच मी शिकणार आहें. प्रचलित-धर्म अपूर्ण आणि सदोष असं मला वाटतं. बापाला निर्घोर मरण यावें, त्याच्या अंतसमयीं त्याला कसलीही उपाधी नसावी आणि यासाठीं त्याच्या कन्येनें हवा तो उपाय अमलांत आणावा हें ज्या धर्मांत सांगितलें नाहीं, आपल्या पतिदेवाच्या प्राणरक्षणार्थ कसलाही गुन्हा क्षम्य आहे हें ज्या धर्मांत सांगितलें नाहीं, ज्या धर्मानें असली एकादी कन्या किंवा स्त्री दोषी ठरते, गुन्हेगार ठरते, तो धर्म अपूर्ण आहे, सदोष आहे असं मला वाटतं.

**वसंतराव:**—सुशीले, व्यवहार आणि नीति यांची सांगड घालणं व्यर्थ आहे. तूं सांगतेस तें नीतितत्व आहे, व्यवहार नव्हे. हें जग कसें चाललें आहे हें तुला अजून बरोबर कळलें नाहीं हेंच खरें!

**सुशीला:**—नीति आणि व्यवहार यांची सांगड पडणं म्हणजेच धर्माची पूर्णता आहे. नीति ही मानव-नियमनशास्त्र आहे आणि व्यवहारही तेंच. मग उगाच नीति आणि व्यवहार यांत भेद कां म्हणतां? नाथ, हेंच ज्ञान मला संपादन केलें पाहिजे. जग खरें कीं मी खरी, हेंच मी अनुभवणार आहें.

**वसंतराव:**—तूं शुद्धींत नाहींस, तुझं डोकें फिरलं आहे अशी माझी आतां पूर्ण खात्री झाली.

**सुशीला:**—आज जशी मी शुद्धींत आहें, आज माझी बुद्धि जशी निर्मळ व विचारक्षम झाली आहे, तशी आजवर कधींही झाली नव्हती व त्यामुळेंच आजचा प्रसंग ओढवला!

**वसंतराव:**—आणि त्याच निर्मळ बुद्धीच्या परवानगीनेंच तूं माझा आणि संसाराचा त्याग करीत आहेस?

**सुशीला:**—होय नाथ, तिच्याच आज्ञेनें!

**वसंतराव:**—मग अशा ठिकाणीं एकच गोष्ट निष्पन्न होते!

**सुशीला:**—ती कोणती?

**वसंतराव:**—कीं तुझं मजवर इतःपर प्रेम राहिलें नाहीं.

**सुशीला:**—आपण बरोबर ओळखलंत!

**वसंतराव:**—सुशीले, हें तूंच बोलते आहेस काय?

**सुशीला:**—नाथ, आपणांस असं सांगतांना माझ्या काळजाला कसे घरे पडत आहेत हें मी किंवा तो संसारसाक्षी परमेश्वरच जाणतो आहे. प्रिया, आपण मला आजवर किती ममतेनें वागविलें हें मला कळत का नाहीं? पण आजच्या प्रसंगानंतर माझं मन अजिबात उडालं.

**वसंतराव:**—हें तूं स्वतःच्या खात्रीनें सांगते आहेस काय?

**सुशीला:**—होय, अगदीं खात्रीनें असंच! आणि म्हणूनच मी आतां या घरांत राहूं इच्छित नाहीं.

**वसंतराव:**—पण तुझ्या प्रेमाला मुकावं असा अपराध तरी मी काय केला आहे? तो तरी सांग.

**सुशीला:**—अलबत, आतां नुकताच तो आपल्या हातून घडला. माझ्या आपणा संबंधाच्या ज्या अपेक्षा होत्या त्या आज अगदीं फोल ठरल्या. आपल्या लग्नाला आज आठ वर्षें झालीं. आठ वर्षांत नवल विशेष कांहीं घडलें नाहीं. आठ वर्षानंतर हा आजचा प्रसंग आला. आजच्या प्रसंगीं मला वाटलं होतं—नव्हे माझी अपेक्षा होती कीं माझा शुद्ध हेतु ध्यानांत घेऊन मी आपल्या प्राणरक्षणार्थ केलेल्या खोट्या सहीच्या धाडसाबद्दल माझं आपण कौतूक कराल. माझ्या मानी हृदयावर घाणेरड्या शब्दांचे घाव घालणार नाहीं आणि त्या रामोशाला सांगाल कीं खुशाल तूं हाकाटी कर हा गुन्हा मीं केला आहे आणि मी काय तें पाहून घेईन. अशा रीतीनें आपल्या प्रिय माणसाचें रक्षण कराल!

**वसंतराव:**—सुशीले, तुझ्यासाठीं रात्रंदिवस काबाडकष्ट करीन, तुझ्या बरोबर सर्व सुखदुःख भोगीन; परंतु मला वाटतें आपल्या प्रियकरणीसाठीं आपल्या अब्रूसही तिलांजली देणें हें कोणासही शक्य नाहीं. सुशीले, उलट मजवर असा प्रसंग असता तर तूं तो गुन्हा आपलेवर घेतला असतास का? नवऱ्यासाठीं अब्रूसही तिलांजली दिली असतीस काय?

**सुशीला:**—नाथ, मी आतां सांगून काय उपयोग? आजपर्यंत हजारों स्त्रियांनीं आपल्या पतिदेवासाठीं आपल्या प्राणांचीच नव्हे तर अब्रूचीही आहुति

मोठ्या आनंदानें दिली आहे. असला आत्मयज्ञ स्त्रीजातीनें अनेकदा करून दाखविला आहे.

**वसंतराव**:—तूं एकाद्या लहान मुलाप्रमाणें बोलते आहेस.

**सुशीला**:—असेन; पण आपण मात्र खऱ्या मर्दाप्रमाणें बोललांही नाहीं आणि कृति तर केलीच नाहीं. आपल्याशीं इतःपर पत्नीभावाच्या नात्यानें बांधून घेण्याच्या लायकीचे आपण नाहीं हें मी स्पष्ट सांगतें आणि हें स्पष्ट सांगतांना मला अतोनात कष्ट होत आहेत. थोड्याच वेळीं पूर्वी म्हटलेलें मला आठवतं कीं ' नाटकरावाच्या उदाहरणावरून मला आठवण झाली. तुझ्यावरही एकादें मोठें संकट यावें आणि त्यावेळीं मी मोठ्या धैर्यानें तें संकट आपणावर घेऊन आपल्या उत्कट प्रेमाची साक्ष प्रत्यक्ष पटवून द्यावी. ' दुर्दैवानें जणूं आपली परीक्षा घेण्यासाठींच साऱ्या आनंदाचा अकस्मात् विरस ध्यानीं मनीं नसलेली गोष्ट प्रगट करून केला; आणि त्या कठोर दैवानें आपले शब्द खरे करण्यासाठीं आपणांस हांक मारली पण आपण त्याच्या कसोटीस उतरलां नाहीं! अंगाशीं आल्याबरोबर आपण मला राक्षशीण, दगलबाज ठरवून माझा त्याग करायला तयार झालांत! नाथ, भीतीचें कारण मोहनरायांनीं नाहींसें केल्याबरोबर, तो दस्तावेज परत मिळाल्याबरोबर जणूं काय कांहीं घडलेंच नाहीं असें दाखवून मी राक्षसिणीची पुनः बुलबुल झालें, चांडाळणीची पुनः फुलपाखरूं झालें, दगलबाज स्त्रीची लाडकी सुशीला झालें. नाथ आपलें हें वर्तन मला दिसल्यावर मला कळून आलें कीं आज आठ वर्षें मी एका अशा माणसाशीं संसार केला कीं ज्याचें मजवर प्रेम कधींही नव्हतें, ज्यानें माझ्या मनस्थितीची कधीं पर्वा केली नाहीं, जो बायको म्हणजे एक उपभोग्य जड वस्तु आहे असं समजतो आणि आपल्या लहरीस येईल त्याप्रमाणें तिला कधीं रागें भरतो, कधीं क्षमा करतो; ज्यानें विवाह या संस्थेची अशी थट्टा केली, ज्यानें आपल्या बायकोच्या खऱ्या प्रेमाची आणि निष्ठेची अशी विटंबना केली. त्या माणसाबरोबर मीं संसार केला, त्यावर परमेश्वरासारखी निष्ठा ठेविली, त्यावर अंतःकरणपूर्वक प्रेम वाहिलें हें पाहून माझें आयुष्य व्यर्थ गेलें, मी आत्मसाधन कांहींच केलें नाहीं असं मला समजलं! याबद्दल माझा मला इतका संताप आला आहे कीं कोणी राई राई एवढे तुकडे माझ्या या अपवित्र शरीराचे उडविल्यास मला समाधानच वाटेल!

**वसंतराव**:—सुशीले, तुझ्या भाषणाचा बोध मला पूर्ण झाला आहे. आपणा दोघांमध्यें स्वभावभेदाची, विचारभेदाची, भयंकर दरी उभी राहिली आहे,

हें कबूल करणें भाग आहे; पण लाडके सुशीले, आपणास हा खड्डा भरून काढतां येणार नाहीं का ?

**सुशीलाः**—सध्याच्या माझ्या स्थितींत मी आपणास योग्य सहचारिणी नाहींच मुळीं !

**वसंतरावः**—पण तुझ्या योग्य सहचारी होण्याचा मी प्रयत्न करणार आहें.

**सुशीलाः**—आपण एकटे राहिल्याशिवाय आणि आत्मशिक्षणाशिवाय आपले प्रयत्न साध्य होणार नाहींत. मी आपल्याजवळ राहून आपणास सिद्धी मिळणार नाहीं !

**वसंतरावः**—तूं म्हणतेस तें बरोबर आहे. पण सुशीले, तुझ्या सारख्या अलौकिक विचाराच्या आणि योग्यतेच्या बायकोपासून मी दूर कसा राहूं ? मला तो वियोग सहन कसा होईल ? ती कल्पनासुद्धां मला सहन होत नाहीं !

**सुशीलाः**—म्हणूनच मी हें घर सोडलेंच पाहिजे. आपलें मन विकारवश आहे. मी येथें राहणें धोक्याचें आहे ! मी आतां जातें !

**वसंतरावः**—काय, आत्तां ! अशा अपरात्रीं ! सुशीले उद्यांपर्यंत थांब ना ?

**सुशीलाः**—परपुरुषाच्या घरांत आजची रात्रही मी घालवूं इच्छीत नाहीं. मी आतांच जाणार !

**वसंतरावः**—तूं अशी जाण्यापेक्षां मी एक तोड सुचवितों.

**सुशीलाः**—काय ती ?

**वसंतरावः**—तुम्ही आम्ही बहिण भाऊ या नात्यानें नाहीं का या घरांत नेहमीं राहूं शकणार ?

**सुशीलाः**—हें फार दिवस चालणार नाहीं हें मी सांगावं असं नाहीं. आपलं मन विकारवश आहे, याचा आपणच विचार करा.

**वसंतरावः**—सुशीले, पुनः कधीं भेटशील का ?

**सुशीलाः**—तें मी काय सांगूं ? माझं यापुढें काय होणार तें मला कांहीं सांगतां येत नाहीं !

**वसंतरावः**—किती झालं तरी आणि कांहीं म्हटलंस तरी तूं माझी बायको आहेस. मला काळजी लागणारच !

**सुशीलाः**—बायकोनें आपण होऊन नवऱ्याचा व घरादाराचा त्याग केल्या-वर त्याला कसलीही काळजी नको. कायद्याचें त्याला बंधन नाहीं. धर्म-शास्त्राची त्याला आडकाठी नाहीं ! तो पूर्णपणें मोकळा आहे. माझ्याविषयींच्या

सर्व बंधनांतून मीं आपणास मुक्त केलें आहें आणि मीही तशीच मुक्त झालें आहें. या किल्ल्या संभाळा. घरांत काय आहे नाहीं तें सारें आपणास आणि विठ्यास माहीत आहे. मी ही अशी जातें आहें. उद्यां मी निरोप पाठवीन. माझं लगेज त्या निरोपांतील अक्षरांबरहुकूम कमी अथवा जास्ती नाहीं असें माझ्या मागें लावून द्या. नाथ, आतां आपण माझे नाहींत आणि मी आपली चिमणी नाहीं, बुलबुल नाहीं, फुलपांखरूं नाहीं किंवा लाडकी सुशीलाही नाहीं. माझा इहलोकचा संसार संपला! हाय, हाय! शेवटीं तो असा संपला!! ( रडूं लागते. )

**वसंतरावः**—संपला, माझाही संसार आटपला! हाय, हाय! सुशीले, यापुढें माझं तुला स्मरण तरी होईल का?

**सुशीलाः**—आपण माझ्या स्मरणांतून कधींही जाणार नाहीं. माझ्या या हतभागी कुडींत जीव आहे तोंपर्यंत हा गांव, हें घर आणि आपली मूर्ति माझ्या स्मरणांतून नाहींशी होणार नाहीं. या प्रसंगाच्या पूर्वी जो मला सुखाचा नुसता भास अनुभवायला सांपडला तोही मी कधीं विसरणार नाहीं!

**वसंतरावः**—सुशीले, माझ्याशीं पत्रव्यवहार तरी ठेवशील का?

**सुशीलेः**—नाहीं, तसं कांहीं एक करूं नका!

**वसंतरावः**—मला तुझं बोलणें कळत नाहीं. अंमळ स्पष्ट सांग. निदान दर महिन्यास कांहीं रकम—

**सुशीलाः**—एक कपर्दिक ही नको! मी आतां सांगितलें ना? तुमचा माझा कांहींएक संबंध आतां उरला नाहीं!

**वसंतरावः**—कधीं कधीं गरज लागल्यास संकोच करूं नकोस!

**सुशीलाः**—तसा प्रसंग मी कधींही येऊं देणार नाहीं. अडलंच तर हाल भोगीन, पण परक्या माणसाची मदत कधींही मागणार नाहीं!

**वसंतरावः**—परक्या माणसांपेक्षां जास्त जवळचा सुशीले कधीं काळीं मला होतां येईल का?

**सुशीलाः**—तसें होतां आलें आणि तसें असावें म्हणून मी आज आठ वर्षें अपेक्षा केली होती. तें झालें तर सृष्टीचेंच स्वरूप बदललें असें मी समजेन. पण जगांत असल्या गोष्टी घडतात हें मला आतां खरेंच वाटत नाहीं!

**वसंतरावः**—तरी पण मला सांग. तूं म्हणतेस ती योग्यता माझ्या अंगीं कधीं येईल का?

**सुशीलाः**—होय, कां नाहीं? परंतु तुमच्या आणि माझ्या मनःस्थिती इतक्या बदलल्या पाहिजेत कीं—पण नाहीं, नाथ, असला चमत्कार घडेलसं माझ्या विश्वासालाच येत नाहीं. आजच्या प्रसंगानं मला असा कडू धडा दिला आहे कीं जगांत माझी अपेक्षा आहे तसल्या मनःस्थितीचीं नवरा बायको कुठें असतील असं मला वाटत नाहीं; आणि अशीं जोडपीं जर जगाच्या समाजांत निपजलीं तर मोठाच चमत्कार घडला असें मी मानीन!

**वसंतरावः**—तुझा विश्वास नसला तरी माझा आहे. सुशीले, सांग, मी तुझ्या प्रेमाला पात्र कधीं होईन?

**सुशीलाः**—ज्या दिवशीं शरीरभेदानें भिन्न दिसणाऱ्या आपल्या आत्म्यांचें खरेंखुरें ऐक्य होईल म्हणजे खोटें लग्न न होतां खरें लग्न होईल, त्या दिवशींच मी आपली पत्नी आणि आपण माझे पती या वाक्याला योग्य ती किंमत येईल! नाथ, आपलें उदाहरण जगापुढें मांडा आणि लोकांना सांगा कीं बांबांनो, लग्न या पवित्र संस्थेची थट्टा करूं नका! खऱ्या प्रेमाची नक्कल करूं नका, त्याला कपटाचें आवरण घालून व्यर्थ त्याची विटंबना करूं नका! नाथ, आपल्या समाजांत सर्व नवरे आपणासारखेच अरेराव आणि स्वार्थबुद्धीचे आहेत आणि सर्व बायका माझ्या सारख्या नवऱ्याची अरेरावी सहन करणाऱ्या अज्ञान आहेत. 'न भजेत् स्त्री स्वतंत्रताम्' अथवा 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' या वचनाबद्दल जितका मला तिरस्कार वाटतो तितकाच परकी ठिकाणच्या बेजबाबदार व बेलगाम Suffragist movement च्या अमर्याद स्त्रीस्वातंत्र्याबद्दलही मला पूर्ण तिरस्कार वाटतो. स्त्री आणि पुरुष यांसारख्या संसृतीच्या दोन चाकांमध्यें सरस आणि नीरस भेद देवाघरचा नसून तो मनुष्यकृत आहे. नाथ, संसारांत जेवढं मोठें स्थान पुरुषांचें आहे तेवढेंच मोठें स्त्रियांचें आहे. One completes another या रस्किनच्या वाक्याचा अर्थ स्त्रीनें किंवा पुरुषानें विसरून चालायचें नाहीं. स्त्रियांना सात्विक स्वातंत्र्य आणि पुरुषांना सात्विक बंधन असें एकमेकांचा ऊनाधिकपणा भरून काढून समतोल राखणारें यंत्र संसृतीच्या गाड्याला जोडल्याशिवाय तो सरळ चालणार नाहीं. हा बोध आपणाला झाला असता तर आपल्या प्राणरक्षणार्थ कसल्याही गुन्ह्यास प्रवृत्त होणाऱ्या माझ्या कर्तव्यनिष्ठ आणि मानी मनाची अवहेलना आपण केव्हांही केली नसती.

[ जाऊं लागते—तोंच वसंतराव आडवा येतो. ]

**वसंतराव**:—नको, दिव्य स्त्रिये, जाऊं नकोस. थोडा वेळ थांब. माझी शेवटची विनंति ऐक. माझ्या सारखे अरेराव नवरे प्रसंगीं कर्तव्यनिष्ठ बायकोचाही कसा अपमान करतात हें तुझ्या माझ्या उदाहरणावरून जग शिकेल तर प्रेमाची—लग्नाच्या या पवित्रग्रंथीची—अशी विडंबना होणार नाहीं हें आतां मला पूर्ण पटलें आहे. 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' आणि Suffragist ची धामधूम हीं दोन्ही सत्यानाशी बंडें मोडून स्त्रीपुरुषांची दिलजमाई करणारा सांखळीचा सोन्याचा दुवा वरील दोन तत्वांमध्यें आहे. 'मर्यादा' हाच तो सुंदर दुवा आहे हें तूं मला स्पष्ट दाखविलें आहेस. सुशीले, मी पूर्ण शुद्धीवर आलों आहें. मला पूर्ण पश्चात्ताप झाला आहे. त्यासाठीं आजवर कधींही तुझ्यासमोर न लवलेलें माझें अरेराव डोकें तुझ्या पायावर ठेवतों; पण ( गहिंवरून ) सुशीले, माझ्या गृहदेवते, मला सोडून जाऊं नकोस. तुझ्या वियोगानें माझे प्राण रहाणार नाहींत. तुझ्यासारख्या अलौकिक विचाराच्या गृहिणीवांचून माझें घर, माझें जीवित केवळ भयाण स्मशान बनेल. या उपर तूं मला सोडून जाणारच असलीस तर या पश्चात्तापानें जळत असलेल्या शरीराला लाथाडूनच तुला जातां येईल. ( सुशीला हतबुद्ध होऊन टेबलावर डोकें टेंकते. )

**सुशीला**—( स्वगत ) माझें यांच्यावर प्रेम राहिलें नाहीं असें मीं मघांच म्हणालें असतांना यांच्या परकी देहाला लाथाडून मला कां जातां येत नाहीं? मला कोणीतरी मागें ओढीत आहे. पतित्याग करण्यास तयार झालेली मी यांच्या या पश्चात्तापदग्ध स्थितीकडे पाहून विरघळलें काय? माझा संताप नाहींसा झाला. माझ्या कठोरवृत्ति मावळल्या. असें कां होत आहे? मी विकारवश झालें काय? नाहीं. विचार आणि विकार एका जागीं राहूं शकत नाहींत. आतांपर्यंत पतीच्या अंशतः अनुज्ञेनेंच मी हें घर सोडीत होतें. पण पतीचा देह लाथाडून मी कशी जाऊं? कोणत्या आर्य स्त्रीनें पतीचा देह लाथाडला आहे? माझ्या मानी मनाचा, शुद्ध हृदयाचा त्यांनीं अपमान केला म्हणून मला किती वाईट वाटलें; आणि आतां यांचें अरेराव मन इतकें दीन झालें, यांचें विकारी हृदय पश्चात्तापानें इतकें शुद्ध झालें असतांना त्यांना लाथाडून गेलें, तर हा त्यांचा केवढा अपमान होईल? ते जीव ठेवणार नाहींत. नाटकभाऊजींनीं रमाबाईंना किती अनादरानें वागविलें, पण माझ्या इतका राग त्यांना कां बरें नाहीं आला? आर्यस्त्री या शब्दांत खरोखरच का इतकी जादू आहे? मला कांहीं कळत नाहीं. छे, माझ्यानें यांना लाथाडून जाववत नाहीं, पण

मला यांच्याजवळ राहतांहि येत नाहीं. विकारी हृदयांत विचाराला थारा फार वेळ मिळत नाहीं. तें पुनः विकारवश होतें. मना, मोहवश होऊं नकोस. इतःपर या घरांत तुला राहणें योग्य होणार नाहीं.

**वसंतरावः**—( तीं बोलत नाहींसें पाहून ) सुशीले, तूं अजूनही कसला विचार करीत आहेस? आमचा धर्म अपूर्ण आहे, आमचा समाज अपूर्ण आहे, आमचे पुरुष अहंमन्य आहेत, परंतु आमची संस्कृती मात्र अपूर्ण नाहीं; आणि आमच्या स्त्रिया तर संस्कृतीपेक्षांही पूर्ण आहेत. किंबहुना त्यांच्यामुळेंच आमची संस्कृति आर्यसंस्कृति या भव्य नांवाला पात्र झाली आहे. अरुंधति, अनसूया, सीता या सारख्या आर्य स्त्रियांनीं ही संस्कृति बनविलेली आहे. तिला अनुभवशास्त्राचा पूर्ण पाठिंबा आहे. ती आतां प्रयोगावस्थेंत राहिली नाहीं. अशा या आमच्या आर्य संस्कृतीच्या शुद्ध साहित्यानें आज हजारों वर्षें घडत आलेला हा आर्य स्त्रीचा सात्विक देह आहे. आर्य स्त्रीच्या संतप्त मनाला लगाम घालण्याचें सामर्थ्य पुरुषांमध्यें नाहीं. हा लगाम तिचें आर्यस्त्रीत्वच घालूं शकतें. आमची आर्य स्त्री हा जगांतील सकल स्त्रीजातीचा सात्विक गुणादर्श आहे.

**सुशीला**—असेल कदाचित्. पण नाथ, मला वाटतें ही आर्यसंस्कृति असावी तितकी शुद्ध नाहीं. हजारों वर्षें या अशुद्ध संस्कृतीमुळेंच बनलेल्या अरेराव आर्य पुरुषांनीं स्त्रीजातीच्या नैसर्गिक दौर्बल्याचा फायदा घेऊन स्त्रियांच्या मनांत पुरुषांविषयीं सेव्यसेवक भाव निर्माण केला आणि या भावनांचीच आयस्त्री बनली आहे. अस्तु; माझें आणि आपलें चरित्र मी जगांतील निःपक्षपाती विद्वानांपुढें ठेवितें आहें. समाजशास्त्र्यांपुढें हा मी एक प्रश्न ठेवतें आहें. जगांतील प्रत्येक स्त्री ही बाहुली आणि तिचा संसार म्हणजे घरकुल यापेक्षां स्त्रीजन्माचा गंभीर अर्थ कधीं कोणी करणारच नाहीं काय? 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' ही आर्यसंस्कृति व Suffragist movement ही पाश्चात्यसंस्कृति या दोहोंमधून एकादा पुण्यमय शुद्ध मध्यम मार्ग नाहीं का? आपण जिला मघां 'मर्यादा' म्हटलें तिची व्याख्या कोणी करील काय? या मर्यादेची व्याख्या जोंवर स्पष्ट होत नाहीं, तोंवर आर्यसंस्कृति हिला पूर्णत्व आलें असें म्हणतां येणार नाहीं. नाथ हें घर सोडून या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं मीं एकांतवास पत्करणें श्रेयस्कर आहे असें अद्यापही मला वाटतें. नाथ, आपल्या समाजांतील प्रत्येक स्त्री लहानपणीं आईबापांच्या हातचं, तरुणपणीं नवऱ्याच्या हातचं आणि म्हातारपणीं मुलाबाळांच्या हातचं बाहुलं

झालेली असते. सात्विक प्रकारचें आत्मस्वातंत्र्य, आत्मकर्तव्य आणि आत्मनिष्ठा यांची जाणीव त्यांना होत नाहीं. कित्येकांना होऊनही उपयोग होत नाहीं. समाजाच्या सद्यःस्थितीच्या वरवंट्याखालीं त्यांचा सात्विक स्वाभिमान चिरडला जातो, आणि शेवटीं हताश हृदयानें राहिलेलें आयुष्य कंठावें लागतें. नाथ, जातांना मीं आपणास विनंति करून जातें कीं आपल्या उदाहरणांतील रहस्य जगाला समजावून सांगा; समाजजागृति करा. सध्यां मी चुकतें आहें कीं आपण चुकतां आहां याचा उलगडा जरी उभयतांना पटला नसला तरी एवढें खरें कीं सध्यांची स्त्रीपुरुषांची परस्पर वागणूक कांहीं बरी नाहीं. ‘ न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ’ अथवा पाश्चात्य स्त्रीचें उत्तान आणि अमर्याद स्वातंत्र्य या दोन्ही अमर्याद आणि हानिकारक परिस्थितींतून उभयपक्षीं हितकारक असा मर्यादेचा मार्ग असणें अत्यावश्य आहे. तो कोणता असावा याचाच विचार करण्यासाठीं हा एकांतवास मी पत्करीत आहें. आपणही तोच विचार करा. समाजांतील सुधारणाप्रिय तसेंच रूढिप्रिय अहंमन्यांपुढें हाच सवाल टाका. बनावट सहीचा गुन्हा पतिदेवाचे प्राण वांचविण्यासाठीं करणें योग्य होईल काय? योग्य ठरल्यास पतिदेवांनीं तिच्या कृत्याचें कौतुक करावें कीं तिचा असा अपमान करावा? हा अपमान झाल्यावर लग्नाच्या व्याख्येची इमारत ढांसळत नाहीं काय? आणि मग अशा स्थितींत परस्परांनीं रूढीस मान देऊन अशुद्ध हृदयांनीं एकत्र रहावें किंवा दोघांनीं विभक्तपणें ब्रह्मचर्यव्रतानें राहून ही परिस्थिति सुधारण्यासाठीं नीट विचार करावा? या प्रश्नांचीं उत्तरें समाजास विचारा. सर्व स्त्रीपुरुषांला बजावा कीं सर्व कर्तव्यांपेक्षां, सर्व धर्मांपेक्षां निदान सात्विक आत्महित हा मोठा धर्म आहे, श्रेष्ठ कर्तव्य आहे. जातें मीं. परमेश्वर तुम्हांआम्हांस सुबुद्धि देऊन सुखी करो!

